# माहेर-सासर

[ तीन संसार-काव्ये ]

कृष्णाजी नारायण आठल्ये

साहित्य प्रसार केंद्र मुंबई चार

**साहित्य प्रसार केन्द्र मुंबई चार**
प्रकाशन क्र. ५१

पहिली आवृत्ती : मार्च १९९५
मूल्य : **साठ रुपये**



मुखपृष्ठ : **अतुल कर्वे**
मांडणी : **आनंदमन**

मुद्रक आणि प्रकाशक :
**मोरेश्वर श्रीधर पटवर्धन**
**साहित्य प्रसार केन्द्र मुंबई चार**
९, डॉ. देशमुख लेन, वि. पटेल रोड,
गिरगांव, मुंबई - ४०० ००४.

अक्षर जुळणी :
**नॅशनल टाईप सेटिंग**
३२, पारेख स्ट्रीट, मुंबई - ४०० ००४
**इमेज डीटीपी सर्व्हिसेस**
७/२, गोरेगांवकर लेन, मुंबई - ४०० ००४.

छपाई :
**शिल्पार्ट**
१५६, राजा बहाद्दूर मोतीलाल मिल कंपाऊंड,
ताडदेव, मुंबई - ४०० ०३४.

## ॥ प्रकाशकाचे चार शब्द ॥

माझी आई आणि नात्यातल्या तिच्या समकालीन पिढीच्या स्त्रिया यांच्या तोंडी 'सासरची पाठवणी' या कवितेतल्या अनेक श्लोकांचे उल्लेख यायचे. 'सासरची पाठवणी' ही दीर्घकविता मी आईच्या तोंडून लहानपणी अनेक वेळा ऐकल्यामुळे माझीसुद्धा तोंडपाठ झाली आहे. कवितेतला काही भाग फारच हृद्य असल्यामुळे मीही फावल्या वेळात, विशेषतः रेल्वे प्रवासात इतर अनेक गाण्यांबरोबर या कविताही गुणगुणत असे.

'गाणी ! मनातली; गळ्यातली !' हा पुस्तक-प्रकल्प हाती घेतल्यानंतर अशा जुन्या असंख्य कविता वाचनात आल्या. अनेक समानशील रसिकांशी संपर्क आला. त्यातलेच एक सुहृद् श्री. पद्माकर महाजन यांच्याकडे केरळकोकिळकार कै. श्री. कृष्णाजी नारायण आठल्ये यांच्या 'सासरची पाठवणी' या कवितेबरोबर 'माहेरचे मूळ' व 'मुलीचा समाचार' या दीर्घ कवितांची पुस्तकेही उपलब्ध होती. ती त्यांनी आनंदाने मला दिली. त्या कवितांचे मी आणि माझे ज्येष्ठ मित्र श्री. राम पटवर्धन यांनी वाचन केल्यावर या तीन संसार-काव्यांच्या एकत्रित पुस्तकाची - 'माहेर-सासर' या पुस्तकाची कल्पना श्री. राम पटवर्धन यांना सुचली. ही कल्पना मलाही रुचल्यामुळे हे पुस्तक प्रसिद्ध करावयाचे ठरले.

प्रा. शांता शेळके यांच्याकडे हा विषय काढल्यावर त्यांनीही, या तीन दीर्घ कविता त्यांना त्यांच्या आईंच्यामुळे परिचित असल्यामुळे, या

पुस्तकाला सविस्तर प्रस्तावना देण्याचे मान्य केले. आज सुमारे शंभर वर्षांनंतर या कविता वाचताना काय वाटते ते त्यांनी आपल्या अभ्यासपूर्ण प्रस्तावनेत मांडलेले आहेच.

केरळकोकिळकार आठल्ये यांच्या एकंदरच जबरदस्त ताकदीबद्दल आजही एक विलक्षण कुतूहल वाटते. केरळकोकिळमध्ये त्यांनी त्यावेळी केलेली पुस्तकपरीक्षणे हृद्य व अभ्यासपूर्ण आहेत. त्यांचा दरारा त्यावेळच्या लेखककवींना वाटत असे. या पुस्तकाच्या निमित्ताने त्यांच्या एकंदर परीक्षण-पद्धतीबद्दल आजच्या रसिकांना माहिती मिळाल्यास ते उपयुक्त होईल या भूमिकेतून आमच्या कविताश्री मासिकाच्या एक लेखिका प्रा. डॉ. जयश्री पाटणकर, नाशिक यांच्या 'केरळकोकिळकारांबद्दल आणखी थोडेसे' या लेखाचा समावेश या पुस्तकात मुद्दाम केला आहे. हा समावेश या पुस्तकाच्या परिशिष्टांत आहे.

केरळकोकिळकारांच्या या तीन दीर्घ कवितांचे 'माहेर-सासर' या पुस्तकातील शंभर वर्षांनतरचे हे एकत्रित पुनर्मुद्रण रसिकांना भावेल असा विश्वास वाटतो.

६।२।१९९५

**मोरेश्वर पटवर्धन**

## अनुक्रम

पान क्र.

## तीन संसारचित्रे : आजही आस्वाद्य आणि अर्थपूर्ण

कृष्णाजी नारायण आठल्ये हे 'माहेर-सासर'च्या लेखकाचे नाव काय किंवा 'केरळकोकिळ' हे त्यांच्या नियतकालिकाचे नाव काय, आजच्या सर्वसामान्य वाचकालाच नव्हे तर साहित्याच्या चांगल्या जाणकार अभ्यासकालाही या दोहोंपैकी एकाची देखील ओळख पटेल असे वाटत नाही. दोन्ही नावे आज कालप्रवाहात वाहून गेली आहेत. तथापि आठल्ये यांच्या नावावर रुजू असलेली साहित्यसेवा किंवा इतर वाङ्मयीन कामगिरी तशी मोजकी नाही की उपेक्षणीयही नाही. काही श्रेष्ठ साहित्यिक हे कालावर मात करून चिरंजीव होतात. तर काहींचा कालान्तराने रसिकांना विसर पडला तरी समकालीन जनमनांवर त्यांच्या साहित्याने आपला लक्षणीय ठसा उमटवलेला असतो. आणि एकूण साहित्याच्या विस्तार-विकासाला पहिल्या प्रकारच्या प्रतिभावंतांबरोबर या दुसऱ्या प्रकारच्या, काहीशा दुय्यम दर्जाच्या साहित्यिकांनीही आपल्या परीने हातभार लावलेला असतो. सर्वसामान्य वाचकांना त्यांचा विसर पडला तरी एकूण वाङ्मयपरंपरेत, वाङ्मयाच्या इतिहासात त्यांच्या नावाची कुठे तरी आवर्जून नोंद होणे आवश्यक असते.

या दृष्टीने कृष्णाजी नारायण आठल्ये यांच्या साहित्यसेवेचा आढावा घेऊ गेल्यास तिचे वैपुल्य आणि विविधता — दोन्ही नजरेत भरल्यावाचून राहात नाहीत. त्यांचे हे कार्य समजावून घेण्यासाठी आठल्ये यांच्या चरित्राचे प्रथम अवलोकन करावयास हवे. त्यांचा जन्म अठराशे बावन्न साली सातारा जिल्ह्यातील कऱ्हाडजवळच्या टेंभू या गावी झाला. ज्येष्ठ सुधारक गोपाळ गणेश आगरकर यांनाही जन्म याच गावी अठराशे छप्पन्न साली झाला. अर्थात आठल्ये हे आगरकरांचे समकालीन असून उभयता शाळेमध्ये परस्परांचे वर्गबंधूही असल्याची नोंद आहे.

आठल्ये यांचे जीवन अनेक चित्रविचित्र घटनांनी भरलेले आहे. त्याप्रमाणे त्यांचे वास्तव्यही निरनिराळ्या ठिकाणी झाले. संस्कृत विषयाचे त्यांनी बाळपणी चांगले अध्ययन केले होते. पुढे त्यांच्या काही मराठी इयत्ता झाल्या. थोडे इंग्रजीही त्यांना अवगत होते. चित्रकलेची त्यांना विशेष आवड होती. आणि मुंबईच्या जे. जे. स्कूल ऑफ आर्ट्समध्ये त्यांनी त्या कलेचा पद्धतशीर अभ्यासही केला होता. त्या काळातले एक मान्यवर कवी आणि बडोद्याचे दिवाण सर टी. माधवराव यांनी आठल्ये यांचे चित्रकलेतले नैपुण्य पाहून त्यांना आपल्या पदरी ठेवून घेतले. पुढे सर टी. माधवराव दिवाणगिरीचे काम सोडून मद्रासला गेले तेव्हा आठल्ये त्यांच्याबरोबर होते. नंतर मद्रासवरून ते मलबारमधील कोची येथे गेले. तिथे त्यांनी 'गीतापद्यमुक्ताहार' हे आपले पहिले पद्यबद्ध पुस्तक लिहिले. त्यात त्यांनी विविध वृत्तांचा सफाईदार वापर केला होता. हे पुस्तक चांगले उतरले असावे. कारण त्याबद्दल निर्णयसागर छापखान्याच्या मालकांनी बारा तोळ्यांचे सोन्याचे कडे आठल्ये यांच्या हाती घालून त्यांचा यथोचित गौरव केला. याच सुमाराला शृंगेरी मठाचे जगद्गुरू श्रीशंकराचार्य यांनी 'महाराष्ट्रभाषाचित्रमयूर' ही सन्मानदर्शक पदवी त्यांना अर्पण केली.

यानंतर आठल्ये यांनी आपले सुप्रसिद्ध 'केरळकोकिळ' हे मासिक काढले. ते पहिली पाच वर्षे कोचीहून निघत असे. नंतर मुंबईच्या गुर्जर कंपनीकडून ते प्रकाशित केले जाऊ लागले. या मासिकाच्या ऐन अमदानीत त्याचे तीन हजारांवर वर्गणीदार होते. महाराष्ट्रातल्या सर्वसामान्य वाचकाला विविध प्रकारच्या रंजक आणि माहितीपर वाचनाची गोडी प्रथम 'केरळकोकिळ' मासिकानेच लावली असे म्हणण्यास हरकत नाही. यातले वेगवेगळ्या प्रकारचे लेख, कविता, पुस्तकपरीक्षणे वाचकांना फार आवडत. आठल्ये यांची भाषाशैली चटकदार, कविता टापटिपीची तशीच व्याकरणशुद्ध आणि विषयांची निवड विविध व चमत्कृतिपूर्ण असे. त्यांची समालोचन-पद्धती मात्र 'भडक, दंशपूर्ण, छद्मी, एकूण विघटनात्मक असे. न्यायीपणाचे पर्यवसान अनेकदा निष्ठुरपणात होई.' तथापि आठल्ये यांचे लेखन हृद्य व आकर्षक असे. भाषा बरीचशी संस्कृतप्रचुर असली तरी तिच्या काव्यात्मतेमुळे ती वाचकांना भुलवून टाकी. अशा रीतीने आठल्ये यांनी

'केरळकोकिळ' मासिक अनेक वर्षे चालवले. एकोणीसशे अठ्ठावीस साली कृष्णाजी नारायण आठल्ये यांचे पुणे येथे निधन झाले.

'केरळकोकिळ' मासिकाचे संपादन तर आठल्ये यांनी यशस्वी रीतीने केलेच, पण त्याबरोबर त्यांनी स्वतंत्र लेखनही भरपूर केलेले आढळते. 'गीतापद्यमुक्ताहार' हे पुस्तक धरून गद्यपद्यात्मक स्वरूपाची एकूण पंचवीस पुस्तके त्यांच्या नावावर रूजू आहेत. वैपुल्याबरोबर त्यात विषयांचे वैचित्र्यही मोठ्या प्रमाणात दिसून येते. त्यांच्या काही पुस्तकांची ही नावे बघावीत : 'ब्रह्मचर्याश्रम', 'मुले थोर कशी करावीत ?', 'सार्थदासबोध', 'विवेकानंदजीवन', 'नजरबंद शिक्षक','फाकडे तलवारबहाद्दर'. विषयांची ही विविधता पाहिली तर आठल्ये यांची जिज्ञासू वृत्ती, सर्वगामी कुतूहल आणि खोल व्यासंग सहज ध्यानात येतो. त्याबरोबर वाङ्मयाच्या विविध रूपाकारांवर (फॉर्म्स) असलेले त्यांचे प्रभुत्वही जाणवते. अतिशय लालित्यपूर्ण व सफाईदार अशा पद्यबद्ध रचनेबरोबर कादंबरी, चरित्रलेखन, विवेचक समीक्षा, वैचारिक किंवा चिंतनपर निबंधलेखन असे इतर कितीतरी रचनाप्रकार त्यांनी हाताळलेले दिसतात. आठल्ये यांचे हे बहुतेक लेखन पुढे कालबाह्य झाले. पण त्यांची तीन छोटी कथाकाव्ये मात्र अपरंपार लोकप्रियता मिळवून गेली आणि त्यांनी दीर्घकाळ वाचकांच्या मनांवर प्रभाव गाजवला. 'सासरची पाठवणी', 'मुलीचा समाचार' आणि 'माहेरचे मूळ' ही ती तीन काव्ये होत.

या तीन काव्यांपैकी 'सासरची पाठवणी' हे काव्य प्रथम 'केरळकोकिळ' मासिकात प्रसिद्ध झाले. पुस्तकरूपाने ते प्रथम वाचकांसमोर केव्हा आले हे निश्चित सांगता येत नाही. कारण त्याच्या पहिल्या आवृत्तीची प्रत 'माहेर-सासर'च्या प्रकाशकांना उपलब्ध झालेली नाही. पण १९०७ सालची तिसरी आवृत्ती मिळाली, तिच्यातील उल्लेखांवरून पहिली आवृत्ती दि. २५ जून १८९६ पूर्वी प्रसिद्ध झाली एवढे सांगता येते. नंतरची नववी आवृत्ती पाहायला मिळाली, पण तिच्यावर प्रकाशनाचे वर्ष छापलेले नाही. (या नवव्या आवृत्तीनंतर आवृत्ती निघाली की नाही याचा शोध घ्यावा लागेल.) 'माहेरचे मूळ' हे काव्य इ. स. १९०५ साली प्रकाशित झालेले. त्याची १९३० सालची सातवी आवृत्तीही पाहायला मिळाली. 'मुलीचा

समाचार'ची पहिली आवृत्ती १९०८ सालची आहे. त्याची सहावी आवृत्ती १९३० साली प्रसिद्ध झाली, ती उपलब्ध आहे. इतक्या आवृत्त्या प्रसिद्ध झाल्या हा त्यांच्या लोकप्रियतेचा उघड पुरावा आहे.

काव्यसंकलनकारांचे आणि पाठ्यपुस्तकांच्या संपादकांचे लक्ष या काव्यांनी – विशेषतः 'सासरची पाठवणी'ने – अल्पावधीतच वेधून घेतले. १९०३ साली प्रसिद्ध झालेल्या 'अर्वाचीन कविता (भाग पहिला)' या कविवर्य चंद्रशेखर – संपादित संकलनात 'सासरची पाठवणी' हे काव्य जवळजवळ संपूर्ण स्वरूपात समाविष्ट केले गेले. मुंबई विश्वविद्यालयाने हे संकलन अभ्यासक्रमात समाविष्ट केले होते. माझ्या लहानपणी आमच्या मराठी चौथीच्या 'कन्यावाचनमाला' या पाठ्यपुस्तकात 'सासरच्या पाठवणी' मधला उतारा होता. ही परंपरा आजही चालू आहे. इ. स. १९८९ च्या 'आठवणीतल्या कविता'च्या पहिल्या भागात 'सासरची पाठवणी'तला उतारा अंतर्भूत केला असून अनेक जुन्या पाठ्यपुस्तकांमधील उताऱ्यांमधले निवडक श्लोक त्यात समाविष्ट केल्याचे संपादकांनी म्हटले आहे.

एक काळ असा होता की या रचना स्त्रियांच्या तोंडी सातत्याने खेळत होत्या. आजही सत्तर-ऐंशीच्या घरात किंवा त्याही पलिकडच्या वयात असलेल्या आणि बाळपणी शिक्षणाचा थोडाबहुत लाभ झालेल्या किती तरी स्त्रियांना या काव्यांतले — विशेषतः 'सासरची पाठवणी'तले अनेक श्लोक तोंडपाठ असतात. त्यांतले अनेक संदर्भ त्यांच्या परिचयातले असतात.

या तीन कथाकाव्यांत 'सासरची पाठवणी' हे काव्य कदाचित सर्वांत अधिक अर्थपूर्ण आणि बोधप्रद ठरेल. विवाहसोहळा आटोपल्यानंतर आणि लाडाकौतुकाचे पहिले काही दिवस संपल्यानंतर मुलगी बहुधा प्रथमच खऱ्या अर्थाने 'सासरी' जायला निघाली आहे आणि तिची अनुभवसंपन्न आई मुलीने सासरी कसे वागावे या संबंधीचे उपदेशाचे, मार्गदर्शनाचे बोल तिला ऐकवत आहे असे या काव्याचे स्वरूप आहे. आईने हळदकुंकू लावून ओटी भरल्यानंतर मुलगी मातृवियोगाच्या कल्पनेने सद्गदित होते आणि 'आई, येते' येवढेच निरोपाचे शब्द कसेबसे उच्चारते. हे वगळले तर पुढचा सारा भाग हे आईचेच निवेदन आहे. हा सर्वच भाग अत्यंत वाचनीय आहे. तसाच तो पराकाष्ठेचा रंजकही आहे. जवळजवळ

एक शतकापूर्वी आपल्याकडील मध्यमवर्गीय ब्राह्मण कुटुंबातले दैनंदिन व्यवहार, आचारविचार, चालीरीती — थोडक्यात म्हणजे त्यांची आदर्श गृहव्यवस्था कशी होती याचे रेखीव, तपशीलवार, चित्रदर्शी वर्णन आठल्ये यांनी इथे केलेले दिसेल.

या काव्यातली मुलीची आई ही केलीसवरलेली, व्यवहारचतुर आणि अतिशय समंजस आहे. तिचे व्यक्तिचित्र आठल्ये यांनी उठावदारपणाने रेखाटले आहे. कविवर्य गिरीश यांनी आपल्या काव्यात एके ठिकाणी 'प्रपंचविदुषी' असे मोठे अर्थपूर्ण विशेषण वापरले आहे. ते या मातेला बरोबर लागू पडते. सासरी गेल्यानंतर कोणत्याही बाबतीत आपल्या मुलीकडे उणेपणा येऊ नये याची ती काळजी घेते आणि त्यासाठी तिची दिनचर्या कशी असावी याचे तपशीलवार वर्णन करते. तिने पहाटे सर्वांआधी उठावे, केरवारे करावेत, तुळशीवृंदावनाची उत्तम निगा राखावी, झाडांना बहर आल्यावर फुले वेचून त्यांचे सुंदर हार गुंफावेत इथपासून तर मुलांची नीट निगा राखावी, त्यांना गोष्टी सांगून त्यांचे रंजन करावे, फावल्या वेळात सतत उद्योगात मग्न असावे इथपर्यंत बारीक सारीक गोष्टी ती मुलीला समजावून सांगते. 'पक्वान्ने, शाकभाज्या, रुचकर चटण्या, रायती, भात नाना' हे पदार्थ कार्यप्रस्थामध्ये करून मुलीने आपल्या अंगचा सुग्रणपणा सिध्द करावा असे जसे या आईला वाटते त्याप्रमाणे मुलीच्या केशभूषेत, वेषभूषेत कुठेंही अधिकपणा नसावा असेंही तिला वाटते.

**वेणी बरी घालुनिया सकाळी**
**अत्यादरे कुंकुम लाव भाळी**
**मोठे नसावे, टिकली नसावी**
**लोकांमध्ये सज्जनता दिसावी**

इथपर्यंत तिच्या अवलोकनात बारकावा आहे. तोच बारकावा मुलींच्या पोषाखाचे वर्णन करताना तिने दाखवला आहे.

**किती घालिती कंचुकी फार तंग**
**तसे तू नको दाखवू रंगढंग**

असे ती आपल्या मुलीला बजावून सांगते. यात तिचे मनुष्यस्वभावाचे सूक्ष्म ज्ञान दिसून येते. सासरी आलेल्या नववधूकडे घरातली माणसेच नव्हेत तर आप्तेष्ट

आणि शेजारीपाजारीही बारकाईने बघत असतात. तेव्हां त्यांना नावे ठेवण्यास तिळभरही कुठे जागा असू नये असेच आपल्या मुलीचे वर्तन असावे याची ही आई काळजी घेते.

या उपदेशातला आणखी एक भाग विशेष महत्त्वाचा वाटतो. आई जुन्या वळणाची असली तरी भाबडी वा अंधश्रद्ध नाही. कुळाचार भक्तिभावाने चालवावेत, स्त्रियांची व्रते पाळावीत हे ती मुलीला अगत्याने सांगते. पण गुप्त मंत्र देणारे गुरू करणे, बुवांच्या पाठीमागे लागणे हा केवळ 'ठगांचा व्याप' आहे म्हणून त्यांच्या कधीही नादी न लागण्याची ती मुलीला निक्षून ताकीद देते. मंत्रतंत्र, गंडेदोरे, बुवाबाजी यांच्या भरीला पडणाऱ्या स्त्रिया आजही आढळतात हे पाहिल्यावर आईने मुलीला दिलेली ही शिकवण त्या काळाच्या संदर्भात फार लक्षणीय वाटते. पातिव्रत्यासारखा दुसरा धर्म नाही, 'सतीला पतीवाचुनी देव नाही', पतिसेवेतच तिला मोक्षमुक्ती लाभते असे उच्च विचार मुलीच्या मनावर ठसवतांना दुसरीकडे ही आई घरातल्या लबाड गड्यांवर लक्ष ठेवणे, आय पाहून खर्चवेच करणे, वजनमापे नीट तपासणे इतकेच नव्हे तर नफातोटा बघून वेळेवर धान्यखरेदी करणे अशा अगदी व्यावहारिक बाबींपर्यंत मुलीला प्रपंचात दक्ष राहण्यात सांगते. तिच्या अवलोकनातली ही सूक्ष्मता, विचारातला चौफेरपणा आणि व्यवहारचातुर्य मन स्तिमित करणारे आहे.

'सासरची पाठवणी' मध्ये आई आपल्या मुलीला सप्तपदीच्या मंत्राचा अर्थ समजावून सांगते तो भाग काव्याच्या दृष्टीने महत्त्वाचा असला तरी आईच्या व्यक्तिरेखेच्या एकसंधपणाला त्यामुळे बाध येतो असे वाटते. इथे आईच्या रूपाने स्वतः कवीच निवेदन करत आहे हे उघड आहे. कवीला त्या अर्थाची आवश्यकताही वाटली असावी आणि स्वतंत्रतः तो सर्व भाग अतिशय काव्यमयही आहे. विवाहविधी चालू असताना 'विप्रांचा बहुमोल बोध' पुरा ऐकायला सापडत नाही आणि मंत्रांचा सरलार्थ वधूवरांना कुणी खुलेपणाने सांगत नाही म्हणून मी तो तुला सांगते, असे आठल्ये यांनी आईच्या तोंडी आलेल्या निवेदनाचे समर्थनही केले आहे. पण कवीला इथे तडजोड करावी लागली आहे. काव्याच्या वास्तव स्वरूपाला त्यामुळे थोडा उणेपणा आला आहे यात शंका नाही. तथापि, येवढी

उणीव सोडली तर 'सासरची पाठवणी' हे काव्य अतिशय प्रत्ययकारी वठले आहे हे मान्य केले पाहिजे.

'सासरची पाठवणी' काव्यात उपदेशावर कवीने अधिक भर दिला आहे तर 'माहेरचे मूळ' मध्ये एका प्रसन्न आणि सुखी संसाराचे त्याने प्रत्यक्षच चित्र रेखाटले आहे. सून कितीही सालस, सद्‌गुणी असली तरी सासरची माणसेही तशीच समंजस व प्रेमळ असावी लागतात. तेव्हाच हे नाते उभयपक्षी सुखावह होते. मुलीच्या अंगच्या गुणांचा योग्य तो विकास होण्यासाठी सासरचे अनुकूल वातावरण किती आवश्यक असते हे या काव्यात आपल्या प्रत्ययाला येते. हा सर्वच कथाभाग अतिशय गतिमान, नाट्यपूर्ण आणि वास्तवाचा प्रत्यय देणारा असा आहे. सून अन्तःपुरात स्नानाला बसलेली असताना भावाचा ओळखीचा शब्द तिच्या कानात पडतो आणि तो आपल्याला माहेरी न्यायला आला आहे या जाणिवेने ती अतिशय उत्कंठित होते इथे या काव्याचा प्रारंभ झालेला आहे. तर मुलगी माहेरी आल्यानंतर आईवडील, भावजय, घरातली छोटी मुले यांच्या भेटीने ती आनंदाने उचंबळून येते तशीच सद्‌गदितही होते असा या काव्याचा शेवट-आहे. इथे तत्कालीन आदर्श कुटुंबाचे चित्र आपल्या डोळ्यांपुढे साक्षात उभे राहते. सुखवस्तू, सुशील आणि प्रेमळ घरातले आनंदी वातावरण प्रत्यक्ष अनुभवतो आहोत असे वाटते. काही आदर्शांच्या पायावर उभी असलेली तत्कालीन कुटुंबव्यवस्था सर्वांनाच किती सुखावह होत असेल याचा आपणास तर्क करता येतो. 'सासरची पाठवणी' मधल्या उपदेशाची ही प्रत्ययकारी परिणती आहे असे म्हणण्यास हरकत नाही.

'सासरची पाठवणी'त जशी आदर्श माता बघावयास सापडते तसे 'माहेरचे मूळ' मध्ये आदर्श सासूचे दर्शन आपल्याला घडते. मुलीचा भाऊ तिला न्यायला आल्यानंतर तिच्या सासरी त्याचे होणारे स्वागत हृद्य आहे. सासूबाई स्वतः सुनेला भावाच्या चहापाण्याची, फराळाची व्यवस्था करावयास सांगतात. इतकेच नव्हे तर 'दे भाकरी त्या गड्या' म्हणून भावाबरोबर आलेल्या गड्याचीही काळजीपूर्वक दखल घेतात. दुपारी मेजवानीचा बेत होतो. त्यात सुनेच्या बरोबरीने सासू काम करते. भाज्या वगैरे चिरून देते. जेवताना 'रूपगुणे समवयस्क' असे दोघे मेहुणे

खेळीमेळीने एकमेकांशी वागतात. इंग्रजीत संभाषण करतात. भाऊ जेव्हा मुलीला माहेरी धाडण्याची तिच्या पतीला विनंती करतो तेव्हा तो विनयाने 'आईबाबांनी संमती दिलेलीच आहे.' असे म्हणतो आणि मुलीचा भाऊ देखील सासूसासऱ्यांची संमती मिळाली तरी 'न्याये आहे तथापि तिजवरि तुमचा सर्वथा आज ताबा' असे म्हणून मेव्हण्याला त्याचा योग्य तो मोठेपणा देतो. मुलगी समंजस आहे. कलाकुशल आहे. पतिसहवासाच्या सुखाची माधुरी तिने अनुभवलेली आहे. म्हणून माहेरची ओढ तिला कितीही लागलेली असली तरी पतीला सोडून काही काळ आपण जात आहोत या जाणिवेने तिचे चित्त व्याकूळ झाल्याखेरीज राहात नाही. तिच्या मनाची ही दोलाचल अवस्था कवीने चांगल्या रीतीने रंगवली आहे. सून माहेरचे फार चांगले संस्कार घेऊन आली आहे. ती केवळ गृहकृत्यकुशल आहे असे नाही, तर रांगोळ्या काढणे, कशिदा भरणे, मुलांसाठी झबली, कुंच्या तयार करणे यात ती पारंगत आहे; इतकेच नव्हे तर तिला शिक्षणाबरोबरच थोडी कवित्वरचनाही साध्य झालेली आहे. 'आर्या श्लोक पदे स्वये रचितसे सर्वांमध्ये पारखी' अशी विविध गुणसंपन्नता तिच्या ठायी असल्यामुळे 'झाली भाउ ! खरोखरीच अमुच्या वंशास ही भूषण' अशी तिची स्तुती प्रत्यक्ष सासरे तिच्या भावापाशी करतात. या सर्व वर्णनावरून त्या काळामध्ये आदर्श अशा सुनेच्या अंगी कोणकोणत्या गुणांची सासरचे लोक किंबहुना सारा समाज अपेक्षा करत असे याची आपणांस कल्पना येते. स्वतः कवी देखील या सुनेच्या रूपाने आपल्या मनातले आदर्श गृहिणीचे चित्र रेखाटून ते वाचकांपुढे ठेवत आहे. त्या वेळच्या नववधू जेव्हा हे काव्य वाचत असतील तेव्हा हे सर्व गुण आपल्या अंगी असावेत यासाठी त्या झटून प्रयत्न करत असतील असा अंदाज आपण करू शकतो.

तथापि या आदर्श सुनेचा स्वतःकडे बघण्याचा दृष्टिकोन काय आहे? ती सासरी अतिशय सुखी आहे. तिला पतीही मनासारखा लाभला आहे. तरी देखील आपली परतंत्रता ती विसरू शकत नाही. तिच्या दृष्टीने विवाहितेचे जीवन कसे असते? तिच्याच तोंडी कवीने घातलेल्या पुढील काव्यपंक्ती त्या काळातल्या स्त्रीजीवनाचे स्पष्ट चित्र डोळ्यांसमोर उभे करतात :

**दावे धरून जिंकडे वळवाल गाय**

**कां कूं कधी न करता तिकडेच जाय**
**घालाल तेच बहु गोड करून खाय**
**देता दुधास न म्हणे परि रंकराय**

या ओळी वाचताना 'आम्ही गायी जातीच्या' या देवलांच्या 'शारदा' नाटकातील शारदेच्या उद्गारांचे स्मरण झाल्याविना राहात नाही. तेव्हाची स्त्री बंधनात होती. त्या बंधनाच्या आत तिने शिकावे, कलानिपुण व्हावे, सर्वांचे प्रेम संपादन करावे, पण त्या सीमेपलिकडे एक पाऊल टाकण्याचाही तिला अधिकार नव्हता. या काव्यातली सून भाग्यवान आहे. पतीपासून ते दिरा-जावा-नणंदांपर्यंत सर्वांची ती अत्यंत लाडकी आहे. पण तरीसुद्धा एकूण स्त्रीजीवनाचा ती जेव्हा विचार करते तेव्हा तिच्या तोंडी कोणते उद्गार येतात?

**जेवू घाला सुरस अथवा जेवणावीण ठेवा**
**जाळा पोळा तरिहि करिते भक्तिने भर्तृसेवा**
**त्याच्यामागे करिति विधवा अन्न देती न पोटा**
**देवा देवा! खचित मुलिचा जन्म हा फार खोटा!**

एका अतिशय सुखी, समाधानी अशा सुनेचे शब्दचित्र रंगवतानाही कवीला सासुरवाशिणीची दुःखे, तिची परतंत्रता, अकाली वैधव्य आलेल्या स्त्रीच्या वाट्याला येणारे भोग यांचे चित्र रेखाटावेसे वाटते ही गोष्ट सूचक आहे. या काव्यातली सून देखील आपल्याला लाभलेल्या संतृप्त जीवनाबद्दल कृतज्ञता व्यक्त करताना 'आता निर्मळ वागणे जपुनि हे कर्तव्य माझ्या शिरी' असे म्हणते! सासरी किंवा एकूण समाजात मिळणारी सहृदय वागवणूक ही आपल्या हक्काची गोष्ट नाही; तो आपला अधिकार नाही, तर वडीलधाऱ्या माणसांनी आपल्यावर केलेली ती कृपा आहे आणि तिच्याबद्दल आपण कृतज्ञ असले पाहिजे असा भाव या सुनेच्या उद्गारांत दिसून येतो. त्या काळातली स्त्रीची बंधने व तिला मिळणारे स्वातंत्र्य या दोहोंचीही हे काव्य वाचताना आपल्याला स्पष्टपणे कल्पना येते आणि त्या काळामध्ये कुटुंबात व समाजात स्त्रीचे स्थान काय होते याचा काहीसा अंदाज आपण करू शकतो!

हे सारे खरे असले तरी 'माहेरचे मूळ'मध्ये एका सुसंस्कृत कुटुंबाचे प्रसन्न

दर्शन आपणांस घडते हे मान्य केलेच पाहिजे. आठल्ये यांनी अशी मोजकी का होईनात, कुटुंबे आसपास पाहिली असावीत. त्याशिवाय इतके प्रत्ययकारी संसारचित्र त्यांना रंगविता आले नसते. या काव्यातल्या सुनेपेक्षाही सासू आपले मन अधिक वेधून घेते. प्रापंचिक रीतीभाती, नातलगांशी वागताना पाळावयाचे उपचार — सारे तिला उत्तम ठाऊक आहेत. सून माहेरी जायला निघते तेव्हा ही सासू तिच्याबरोबर घरच्या मुलांसाठी आंब्याची करंडी, फणस, पेढे, चिवडा असा खाऊ देते. तिच्या आईला देण्यासाठी भरजरी खण आवर्जून देते. सुनेला वाटेत 'पाणी पिण्यासाठी या चार गोळ्या असू देत' म्हणून लाडू द्यायला ती विसरत नाही. व्यवहारचातुर्य तिच्या अंगी किती आहे हे ती सुनेला दागिन्यांचा डबा नीट सांभाळायला सांगते त्यावरून ध्यानात येते. 'सासरची पाठवणी' मधली आई आणि 'माहेरचे मूळ'मधली सासू या दोन पिढ्यांमागल्या कुटुंबवत्सल, प्रौढ, प्रापंचिक गृहिणींचे अतिशय वेधक चित्र कवी आपल्या डोळ्यांसमोर उभे करतात यात शंका नाही.

'मुलीचा समाचार' मध्ये आठल्ये यांनी त्या काळच्या सासुरवासाचा प्रत्यय आपल्याला दिला आहे. अतिशय सुशील, सोशिक, सद्‌गुणी सून आणि तिचा पराकाष्ठेचा छळ करणारी कजाग सासू यांचे या काव्यातले चित्र तत्कालीन समाजाच्या एका जाचक वास्तवावर भेदक प्रकाश पाडते. 'माहेरचे मूळ'मधली सासू ही तेव्हाही विरळाच आढळत असणार. पण 'मुलीचा समाचार' मधल्या क्रव्याद सासवांचे मात्र घरोघरी दर्शन होत असे. किंबहुना सासूने सुनेला छळावे यात काही विपरीत किंवा आक्षेप घेण्याजोगे आहे असे कुणाला वाटतच नसे. तो एक सर्वमान्य असा लोकाचार होता. मला आठवते, माझ्या लहानपणी एक गाणे मी ऐकलेले होते. आता ते माझ्या स्मरणात राहिलेले नाही. पण 'असा कसा हा सासुरवास ऐकियला नाही । खांबेट्यांची सून तियेचे नाव कृष्णाबाई' अशा त्या गाण्याच्या प्रारंभीच्या ओळी होत्या आणि कुणा एका खांबेट्यांच्या सुनेला असह्य सासुरवास कसा सोसावा लागला आणि त्यातच शेवटी तिचा अंत कसा झाला याचे मोठे हृदयद्रावक चित्र त्या गाण्यात रेखाटले होते. एका सत्य घटनेवर ते गाणे आधारलेले होते.

'मुलीचा समाचार'मधली सासू क्रूर, निर्दय, सुनेचा अपरिमित छळ करणारी, तिच्यावर खोटेनाटे आळ घेणारी आणि तिच्या पोटाला सुद्धा पुरेसे अन्न न देता तिला उपाशी ठेवणारी अशी आहे. मुलगी माहेरी येते तेव्हा तिचा कोमेजलेला चेहरा, अंगावरचे माराचे डाग आणि दुबळी प्रकृती पाहून आई मनातून चरकते. ती तिला सासरचा समाचार विचारते. पण मुलगी आपला सासरी होणारा छळ बोलून दाखवत नाही. तेवढ्यात तिच्या सासरी शेजारालाच राहणाऱ्या कुणी एक शेखदारीणबाई यमूच्या —त्या मुलीच्या— आईकडे बसायला म्हणून येतात आणि तिच्या सासरी सासू तिचे किती हाल करते याचे साग्रसंगीत चित्र यमूच्या आईसमोर रंगवतात. या छळाचे विविध प्रकार आठल्ये यांनी मोठ्या प्रभावी रीतीने दाखवून दिले आहेत. कठोर अपशब्दांनी सुनेला बोलणे, प्रसंगी तिच्या अंगावर हात टाकणे, मुलाची व तिची एकान्तात गाठ पडू न देणे, तिच्यावर चोरीचा आळ घेणे आणि अन्य अनेक प्रकारांनी तिला जगणे नकोसे करून सोडणे या सासुरवासाच्या अनेक परी इथे पाहावयास मिळतात. यमूच्या सासूच्या अंगी इतरही अनेक दुर्गुण आहेत. सुनेला उपाशी ठेवणारी ही सासू स्वतः 'गोडघाशी' आहे. सुनेला पतिसुखाला वंचित करणारी ही सासू रोज रात्री माडीवर आपल्या नवऱ्याच्या भेटीला जाताना अंगावर दागदागिने घालून, नाना प्रकारे नटून तयार होते. तिच्या साजशृंगाराचे वर्णन कवी असे करतो :

> **रात्री नेसोनि शालू नटुनि उलट ते केसही विंचरून**
> **वेणीचा उंच खोपा सजवुनि गजरा घालिते त्यावरून**
> **तोडे वाकी फुलेही चढवुनि कटिला घालिते माजपट्टा**
> **नाही खंती जिवाला करितिल जन की मागुनी सर्व थट्टा**

या सासूच्या दुष्टपणाला, स्वभावातील क्षुद्रतेला आणि छळवादी वृत्तीला खरोखरच सीमा नाही. सुनेला तर ती सतत छळत असतेच पण शेजाऱ्यापाऱ्यांशीही तिचे पटत नाही. पंक्ती जेवून उठल्या म्हणजे ताटांत उरलेले लाडू गोळा करून व ते शेजाऱ्यांना वाटून आपल्या औदार्याचे प्रदर्शन करण्यापर्यंत तिची मजल जाते. सुनेचे कष्ट कमी व्हावेंत म्हणून एखादी सहृदय शेजारीण जर तिला मदत करू लागली तर ही सासू तिला झिडकारून टाकते. ती आळशी आहे. कजाग आहे;

घरातली स्वच्छता देखील ती पाळत नाही. तिचे ताक घाणेरे असते. मेतकुटात आळ्या पडलेल्या असतात आणि लोणच्यांत सुते लिवलिवताना दिसतात.

आठल्ये यांनी या सासूचे चित्र रेखाटताना तिला सर्व दुर्गुणांची खाण बनवले आहे. त्यामुळे हे चित्र काहीसे अतिशयोक्त झाले आहे आणि त्या प्रमाणात ते वास्तवापासून दूरही गेले आहे. तथापि, या चित्रणातले बरेच तपशील खरेपणाने आपल्याला भावतात हेही मान्य केले पाहिजे. भोवतालच्या समाजातल्या अनेक छळवादी सासवांचे बारकाईने निरीक्षण करून आणि त्यातले सत्याचे कण वेचूनच आठल्यांनी ही सासू मूर्त केली आहे यात शंका नाही.

तथापि अशा कजाग आणि छळवादी सासूच्या हाताखाली कष्टाने दिवस काढणारी, तरुण वयात पतिसुखाला वंचित केली जाणारी, प्रसंगी उपासमारही सहन करावी लागणारी सून कशी आहे? तिचे चित्र आठल्यांनी अतिशय उदात्त असे रेखाटले आहे. माहेरी आल्यावर आई तिच्या अंगावरचे वळ, माराच्या खुणा, कोमेजलेला चेहरा बघून मनात चरकते आणि 'यमू, तुझी गत मला बरी दिसत नाही' असे म्हणते. पण ही शहाणी, सोशीक आणि समंजस मुलगी सासरी होणाऱ्या आपल्या छळाचा मागमूसही आईला लागू देत नाही. उलट 'मी आता वाढीला लागले म्हणून कृश दिसते. थंडीमुळे हातापायांना चिरा गेल्या आहेत. हाताला फोड आले म्हणून बिब्ब्याच्या फुल्या दिल्या त्या नासल्या असे काहीबाही सांगून आपल्या खराब झालेल्या प्रकृतीचे ती समर्थन करते. शेखदारीण बाई येऊन जेव्हा यमूच्या घरची वस्तुस्थिती, तिचा सासुरवास, तिला होणारे अपरिमित कष्ट यांचे चित्र यमूच्या आईपुढे उभे करते तेव्हा अर्थातच आईला अतिशय वाईट वाटते. 'तुम्ही हुंडापांडा देऊन, मानपान करून यमूला श्रीमंत घर बघून दिले पण त्याचे चीज झाले नाही' असे ही शेखदारीण बाई सांगते. पण यमू मात्र सासूबद्दल किंवा एकंदर सासुरवासाबद्दल अवाक्षरही वावगे काढत नाही. उलट

**देते कर्मानुसार क्षितिवरि मनुजा दुःखसौख्यास दैव**

असा तात्त्विक विचार बोलून दाखवते. शिवाय ती असेही म्हणते :

**आहे माणुस मुख्य सज्जन किती देवे दिले आपले**<br>**होता दर्शन लोचने मन निवे दुःखे जरी तापले**

असे पर्यायाने पतीबद्दलचे आपले उत्कट प्रेम व्यक्त करते. भविष्यावर नजर ठेवून वर्तमानकाळ सहन करावा ही तिची भावना पुढील ओळींत प्रकट झाली आहे :

**नाते आहे मुलाचे तरिहि कळतसे आइचा राग त्यास**
**येत्या वर्षी परीक्षा, हरि करिल तरी, खास होईल पास**
**आनंदाने पुढे तो दिवस उगवुनी हाहि जाईल काल**
**ठेवावे मात्र देवे सकलहि अमुच्या माणसांना खुशाल!**

यमूचा हा समजूतदारपणा, तिची सोशिक वृत्ती, व तिचे क्षमाशील धीरोदात्त वर्तन बघून मन खरोखर गहिंवरते!

आठल्ये यांचे हे प्रत्येक काव्य आपल्या परीने स्वतंत्र, स्वयंपूर्ण असले तरी त्या तिन्ही काव्यांना जोडणारे एक अंत:सूत्र बारकाईने जाणवते असे म्हटले पाहिजे. त्या काळातील आदर्श सुनेबद्दल कुटुंबीयांच्या आणि एकूण समाजाच्या काय अपेक्षा असत याचा आठल्यांनी इथे विचार केला आहे व तो करताना तत्कालीन कुटुंबव्यवस्थेचा आणि समाजव्यवस्थेचा एक अतिशय चोख असा आलेख त्यांनी रेखाटला आहे. हा समाज तसा मर्यादित आहे. जरा श्रीमंत पातळीवर वावरणारा मध्यमवर्गीय ब्राह्मणवर्ग इथे आपल्याला भेटतो. त्यांचे दैनंदिन जीवन, आचारविचार, देवधर्म, भोजनाची आणि आदर-सत्काराची पद्धत, कुटुंबातील व्यक्तींचे परस्परांशी असलेले नातेसंबंध यांचे इतके अकृत्रिम आणि तपशीलवार चित्रण अन्यत्र क्वचितच बघावयास मिळेल! जे कार्य हरिभाऊ आपटे यांनी आपल्या सामाजिक कादंबऱ्यांमधून, देवलांनी आपल्या 'शारदा', 'संशयकल्लोळ' सारख्या नाटकांतून केले तेच आठल्ये यांनी आपल्या या कथाकाव्यांच्या द्वारा तितक्याच परिणामकारक रीतीने साधले आहे असे म्हणण्यास प्रत्यवाय नाही.

या काव्यांत जी वेधकता निर्माण झाली आहे त्यात आठल्ये यांच्या निवेदनपद्धतीचा आणि शैलीचा फार मोठा वाटा आहे. प्रथम एक गोष्ट स्पष्ट करावयास हवी. आठल्ये हे केशवसुत, बालकवी यांच्यासारखी दैवदत्त कवित्वशक्ती लाभलेले उत्स्फूर्त प्रतिभावंत नाहीत. ते एक अतिशय कुशल असे पद्यकार — व्हर्सिफायर — आहेत. सूक्ष्म अवलोकन, वेधक निवेदनशक्ती,

वृत्तरचनेवरील असामान्य प्रभुत्व, लयबद्ध आणि ओघवती अशी प्रसन्न रसाळ शैली हे त्यांचे गुण मान्य केले पाहिजेत. आठल्ये ज्या काळात आपली काव्ये लिहित होते त्या वेळी प्रतिभासंपन्न कवींप्रमाणेच उत्तम पद्यरचनाकारालाही एकूण काव्यव्यापारात त्यांचे त्यांचे म्हणून एक विशिष्ट स्थान होते व त्याला विनातक्रार मान्यता दिली जात असे. समकालीन लेंभे, लोंढे, मोगरे, लेले, राजवाडे हे या प्रकारचे रचनाकार होत आणि आठल्ये यांची जागा या दुसऱ्या वर्गात आहे.

हे एकदा मोकळेपणाने सांगून टाकल्यानंतर आठल्ये यांच्या ठायी असलेल्या वाङ्मयीन गुणांचे योग्य ते श्रेय त्यांना द्यावयास हरकत नाही. अगदी प्रथमदर्शनी डोळ्यांत ठसठशीतपणे भरणारा आठल्ये यांचा पहिला गुण म्हणजे त्यांची निर्दोष आणि वैविध्यपूर्ण अशी वृत्तरचना. आठल्ये आणि त्यांचे अनेक समकालीन कवी यांचा संस्कृत काव्यनाटकांशी आणि मराठी पंडित कवींच्या अभिजात विदग्ध काव्यकृतींशी घनिष्ठ संबंध असे. परशुरामतात्या गोडबोले, गणेशशास्त्री लेले इत्यादींनी तर संस्कृत काव्यनाटकांची सरस भाषान्तरेही केली होती. त्यामुळे वृत्तबद्ध रचना आजच्या कवींना जेवढी अपरिचित आणि त्यायोगे अवघड होऊन बसली आहे तशी परिस्थिती तेव्हा नव्हती. राजवाडे, लेंभे, लोंढे, पारखी असे तत्कालीन अनेक कवी वृत्तबद्ध रचनेत निपुण होते. तरीही आठल्ये यांच्या वृत्तबद्ध रचनेचे काही विशेष आपणांस ठळकपणे जाणवल्याखेरीज राहात नाहीत.

आठल्ये यांच्या रचनेमध्ये सहजता, प्रासादिकता आणि रसाळपणा आहे. वृत्तबद्ध रचना अनेकदा संस्कृतप्रचुरतेमुळे क्लिष्ट आणि दुर्बोध होते. पण या दोषांचा स्पर्शही आठल्ये यांच्या या कथाकाव्यांना झालेला नाही. वेगवेगळ्या वृत्तांवरील त्यांचे प्रभुत्व स्तिमित करणारे आहे. शार्दूलविक्रीडित, मंदाक्रांता, स्रग्धरा ही वृत्ते त्यांची विशेष आवडती असावीत. पण त्यांखेरीज पृथ्वी, शिखरिणी, मालिनी, वसंततिलका, भुजंगप्रयात, द्रुतविलंबित, इंद्रवज्रा, उपजाति अशी इतरही अनेक वृत्ते त्यांनी वापरली आहेत. फार काय, चामर, कामदा अशा सहसा वापरात नसलेल्या वृत्तांचा त्यांच्या रचनेत उपयोग केलेला दिसून येतो. हे वृत्तवैचित्र्य अनेकदा रसपरिपोषकही ठरते.

आठल्ये यांची ही तिन्ही काव्ये वाचताना वामन पंडित, रघुनाथ पंडित, मोरोपंत आणि पंडिती परंपरेतले इतरही लहानमोठे अनेक कवी यांच्या रचनांचा त्यांनी किती सूक्ष्म अभ्यास केला होता आणि त्यांच्या शैलीचे किती खोल संस्कार त्यांच्यावर झाले होते याची चांगली कल्पना येते. या कवींच्या रचनापद्धतीचे थेट आणि हुबेहूब अनुकरण त्यांनी या काव्यांतून अनेक ठिकाणी केले आहे. वामन पंडित आणि रघुनाथ पंडित यांचे शार्दूलविक्रीडित वृत्तावर चांगले प्रभुत्व होते आणि आपल्या श्लोकांत ओळींमध्ये अनुप्रास साधण्याची त्यांची म्हणून एक खास लकब होती. उदाहरणार्थ वामन पंडितांचा पुढील सुप्रसिद्ध श्लोक बघावा :

**वंशी नादनटी तिला कटितटी खोवोनि पोटीपटी,**
**कक्षे वामपुटी, स्वशृंग निकटी, वेताटिही गोमटी,**
**जेवी नीरतटी, तरूतळवटी, श्रीश्यामदेही उटी,**
**दाटी व्योमघटी सुरां, सुखलुटी घेती जटीधूर्जटी**

किंवा रघुनाथ पंडितांची ही अन्तर्यमके साधणारी रचना बघावी :

**जो धैर्ये धरसा, सहस्त्रकरसा तेजे तमा दूरसा,**
**जो रत्नाकरसा गभीर, शिरसा भूपां यशोहारसा**
**ज्ञाता जो सरसावला नवरसांमाझारि शृंगारसा**
**शोभे तामरसाक्ष तो नळ रसानाथ स्तवू फारसा**

याच पद्धतीची अनुप्रासयुक्त अंतर्यमके ओळींमध्ये साक्षेपाने साधणारी आठल्यांची ही श्लोकरचना लक्षणीय आहे :

**मर्यादा धरणे, स्वकार्य करणे, साधेपणे वागणे**
**द्या द्या वस्तु म्हणोनिया नच कधी कोणासही मागणे,**
**जे पानावरती पडेल समयी नेमस्त ते भक्षणे,**
**ही लोकप्रिय व्हावयास बरवी आहेत गे लक्षणे !**

किंवा त्यापेक्षाही पुढील श्लोक थेट अशा प्रकारच्या रचनेचे स्मरण करून देणारा आहे :

**हे तो नित्य रडे, सदा धडपडे, हे शेंबडे, मेकडे,**
**हे आहे चिपडे, क्षणक्षणि पडे, बोले महावाकडे**

**डोक्याला खवडे, बसे नचं कडे, छांदिष्ट मोठे कुडे**
**हे मारून खडे, किती बडबडे, फाडीतसे आंगडे**

एका अनामिक कवीचा पुढील श्लोक फार प्रसिद्ध आहे. गडकऱ्यांनी आपल्या 'भावबंधन' नाटकात त्याचा फार रसपूर्ण आणि हृदयस्पर्शी वापर केल्याचे अनेकांना आठवत असेल.

**वेदाभ्यास नको, श्रुती पढु नको, तीर्थासि जाऊ नको,**
**शास्त्राभ्यास नको, व्रते मख नको, तीव्रे तपे ती नको,**
**काळाचे भय मानसी धरु नको, दुष्टांसि शंकू नको**
**ज्याचीया स्मरणे पतीत तरती तो शंभु सोडू नको**

आता याच रचनापद्धतीचे स्मरण करून देणारा आठल्ये यांचा पुढील श्लोक बघावा :

**शांती सोडु नको, कधी रुसु नको, स्वच्छंद वागू नको**
**लज्जा सांडु नको, उगी बसु नको, कोणास मागू नको**
**रागे बोलु नको, अढी धरु नको, चोरून खाऊ नको**
**कोठे जाउ नको, परस्थ पुरुषां पाहून हासू नको.**

आठल्ये यांच्या श्लोकरचनेवर पंडिती परंपरेची केवळ छापच नाही तर त्या काव्याचा त्यांनी रसिकतेने व साक्षेपाने किती गाढ व्यासंग केला होता हे या काही उदाहरणांवरून दिसून येईल.

वृत्तरचनेतली सर्व सफाई आणि विविधता सांभाळूनही आठल्ये आपल्या रचनेत कुठे बोजडपणा येऊ देत नाहीत. उलट अनेकदा तिच्यामध्ये दैनंदिन बोलीभाषेची सहजता आणि सौंदर्य आणण्यात ते कमालीचे यशस्वी झालेले दिसतात. वृत्तबद्ध रचनेत संवादांचा वापर करणे हे माधव जूलियन यांनी आपल्या 'विरहतरंग', 'तुटलेले दुवे' अशा काव्यांतून यशस्वी रीतीने साधलेले आहे. परंतु त्यांच्याही आधी किती तरी वर्षे लिहिल्या गेलेल्या या तीन कथाकाव्यांतून आठल्ये यांनी किती सहज व स्वाभाविक वाटतील असे संवाद गुंफलेले आहेत हे बघून आश्चर्य वाटल्याखेरीज राहात नाही. या संवांदाची काही उदाहरणे बघावीत :

**भाऊ येउनि आत हासुनि पुसे, 'आहेस बाळे ! बरी ?'**

बोले 'होय' हळूच सस्मित मुखे लाजोनि जाई दुरी
'भाऊ काय पितो चहा तव मुली ?' सासूहि ऐसे वदे
'आलासे दमुनी तया झडकरी काही फराळास दे
किल्ल्या घे फडताळ तूच उघडी, लाडू चिरोटे वड्या
चांदीच्या तबकात ठेव भरुनी, दे भाकरी त्या गड्या
साधे सर्व तुला महाचतुर तू जा पेटवी लौकरी —
'स्टो' का 'फो' नकळे तयावरि चहा, सांजाहि ताजा करी'

प्रतिष्ठित ब्राह्मण कुटुंबातल्या कर्त्या गृहिणींच्या बोलण्याची ढब, धाटणी या संवादातून किती हुबेहुब प्रत्ययाला येते ! याचाच एक आविष्कार म्हणजे आठल्ये यांनी आपल्या काव्यांतून वापरलेल्या म्हणी. त्या वास्तवाचा आभास किती चांगला निर्माण करतात हे मुळातूनच बघण्याजोगे आहे. 'येरंडाचे, नको गे, निजमुख शिणवू , 'गाळुनीया गुन्हाळ', एक्या हाते कधि तरि मुली वाजते काय टाळी ?', 'ज्याला त्याला निजसम जनी वाटती लोक सारे', 'देवा देवा ! खचित मुलिचा जन्म हा फार खोटा', 'हरीच्यावरी सर्व माझा हवाला', 'कोठेही जा सतत अपुला बायकांना उशीर' अशा म्हणी आणि वाक्प्रचार काव्यातील वातावरणनिर्मितीला किती उपकारक ठरतात !

आठल्ये यांनी या तीन कथाकाव्यांतून जी संसारचित्रे रंगवली आहेत त्यांचा व्याप आणि विस्तार मर्यादित आहे. पण समाजाचा तेवढा विशिष्ट तुकडा त्यांनी विलक्षण प्रत्ययकारी रीतीने चित्रित केला आहे. आठल्ये यांचे अवलोकन जसे सूक्ष्म आहे तसे मनुष्यस्वभावाचे त्यांचे ज्ञानही आश्चर्य वाटावे असे आहे. सासरी जाणाऱ्या मुलीला आई जो उपदेश करते त्यामध्ये आपण चांगले असण्याइतके चांगले दिसण्यालाही महत्त्व आहे हे ती परोपरीने मुलीच्या मनावर ठसवते. नववधूला लोकापवादाला फार जपावे लागते याची या आईला चांगली जाणीव आहे. म्हणून ती मुलीला 'लोकांमध्ये सज्जनता दिसावी', 'कधिच बसु नये बायकांनी रिकामे' 'परस्थ पुरुषां पाहून हासू नको' अशा अत्यंत मार्मिक आणि व्यवहारोपयोगी सूचना देते.

आठल्ये यांच्या सूक्ष्म निरीक्षणाचे अनेक नमुने या कथाकाव्यांत आढळतात.

'माहेरचे मूळ' मधली सासू अतिशय सहृदय व प्रेमळ आहे. तरीही प्रपंच कसा टुकीने करावा हे ती जाणते. 'लाडू चिरोटे वड्या' ठेवलेल्या फडताळाला कुलूप लावण्यास ती विसरत नाही. सून माहेरी जाताना ती तिथल्या सर्व मंडळींना भेटवस्तू पाठवते. 'मुलीचा समाचार'मधली कजाग सासू सून वयात आल्यावर तिचे यौवन बहरून आपल्या मुलाला तिच्याविषयी आकर्षण वाटू नये म्हणून तिचे मीठ तोडते. हे तपशील आठल्ये यांच्या अवलोकनाचे द्योतक आहेत, त्याप्रमाणे तत्कालीन ब्राह्मण कुटुंबांचे अंतरंगही ते आपल्या डोळ्यांसमोर हुबेहूब उभे करतात.

आठल्ये हे अतिशय कुशल असे पद्यकार आहेत. उत्स्फूर्त प्रतिभेचा उद्रेक किंवा हृद्य कविकल्पनांचा आढळ त्यांच्या या कथाकाव्यांत होत नाही हे खरे आहे, पण तपशिलाचा अचूकपणा, स्वभावोक्तिपूर्ण वर्णने आणि चित्रदर्शी प्रसंगरेखाटने यांच्या योगाने त्यांचे लेखन अनेक ठिकाणी मनाला भिडल्यावाचून राहात नाही हेही तितकेच खरे. माहेराहून आलेल्या भावाशी बोलताना बहीण काय म्हणते ते आठल्ये सांगतात,

**'वैनीलाही?' स्मितमुखि म्हणे, 'ऐकिले चार मास'**

या एका ओळीत बहिणीच्या मनातली उत्कंठा, कुतूहल आणि माहेराविषयीचा जिव्हाळा किती सुंदर रीतीने व्यक्त झाला आहे ! अशा अनेक जागा या काव्यांत आढळतात. क्वचित काही तपशील अगदीच गद्य वाटतात. माहेरच्या हकिगती सांगतात भाऊ 'आंबेही पिकले गहूंहि विकले' ही गद्यातच शोभणारी माहिती देतो. 'सासरची पाठवणी' मध्ये मुलीला सासरी कसे दक्ष असावे हे सांगताना आई म्हणते,

**सारे घरातिल गडी असती अनाडी**
**भाजीमध्येहि बहुधा करिती लबाडी**
**ह्याकारणे वजनमाप कधी तपाशी**
**घालू नको जिकिर फार परंतु त्यांशी !**

तथापि अशी रूक्ष व गद्य स्थळे इथे फार नाहीत हेही खरे !

आठल्ये यांची ही काव्ये इतकी लोकप्रिय का झाली असावीत ? कवीची प्रासादिक आणि रसाळ शैली, अचूक व्यवहारज्ञान, यथातथ्य वातावरणनिर्मिती,

व्यक्तिरेखांचे जिवंतपण ही या लोकप्रियतेची काही कारणे आहेत. पण या काव्यांचा आपल्या काळाशी आणि तेव्हाच्या वैचारिक व सांस्कृतिक वातावरणाशी जो अचूक सांधा जुळलेला आहे ते त्यांच्या लोकप्रियतेचे सर्वांत मोठे कारण आहे असे वाटते. एकोणिसावे शतक आणि विसावे शतक यांचा हा संधिकाल होता. अठराशे अठरा साली इंग्रजांचे राज्य या देशात आलेले असले तरी उभय संस्कृतींचा पूर्ण मेळ अद्यापही बसलेला नव्हता. लोकहितवादी, आगरकर असे विचारवंत आणि हरिभाऊ आपटे, केशवसुत यांसारखे ललितलेखक नवविचारांचा, नवीन सुधारणांचा आणि स्त्रीविषयक उदार धोरणाचा प्रसार समाजात हळूहळू करू लागले होते. गोविंद वासुदेव कानिटकर याचे 'स्त्रियांची परवशता' हे पुस्तक प्रसिद्ध झाले होते. स्त्रीशिक्षणाचे वारे समाजात वाहण्यास प्रारंभ झाला होता. हरिभाऊ आपटे यांच्या 'पण लक्षात कोण घेतो !', 'यशवंतराव खरे', 'मी', 'भयंकर दिव्य' अशा कादंबऱ्या एव्हाना प्रसिद्ध झाल्या होत्या आणि स्त्रियांच्या दुःखाच्या नाना परी प्रथमच समाजापुढे मांडल्या जात होत्या. तरीही एकूण सामाजिक विचारधारणा ही पारंपारिक कल्पनांतून अद्याप बाहेर आली नव्हती. स्त्रीस्वातंत्र्याच्या आणि स्त्रीमुक्तीच्या आकांक्षा तर अद्याप भविष्यकाळाच्या उदरातच दडलेल्या होत्या. अशा या परिस्थितीत समाजमनाला रुचणारे विचार आकर्षक कथानकांच्या द्वारा आणि लालित्यपूर्ण सुभग शैलीत त्याच्यासमोर मांडणारी आठल्ये यांची ही तीन छोटी कथाकाव्ये अत्यंत लोकप्रिय झाल्यास त्यात आश्चर्य काहीच नव्हते.

या काव्यांनी आणखी एक गोष्ट साधलेली आहे. त्यांनी तत्कालीन मध्यमवर्गीय जीवनाचा — विशेषतः स्त्रीजीवनाचा — अचूक आणि वास्तवपूर्ण छेद घेतला आहे. स्त्रीचे आदर्श रूप त्या काळी ठरलेले होते. तिने सासरी कसे वागावे, घरकामात नैपुण्य कसे संपादन करावे, वडीलधाऱ्यांना कसा मान द्यावा, पती हेच आपले जीवनसर्वस्व कसे मानावे आणि मुख्य म्हणजे पूर्णतः आत्मविलोप करून फक्त घरासाठीच सतत कसे जगावे याचे निकष इतरांनीच केवळ नव्हेत तर प्रत्यक्ष स्त्रियांनीही ठरवून टाकलेले होते. त्या कसोट्यांना उतरणारी स्त्री ही आदर्श पत्नी, आदर्श गृहिणी मानली जाई. आठल्ये यांनी 'सासरची पाठवणी' मध्ये आईकरवी नवविवाहित मुलीला सासरी कसे वागावे यासंबंधी हाच उपदेश

करवला आहे. 'माहेरचे मूळ'मधली सून विवाहितेच्या याच आदर्श कसोट्यांना पुरेपूर उतरणारी आहे. 'मुलीचा समाचार' मध्ये आठल्ये यांनी एक कजाग कृत्या वाटेल अशी छळवादी सासू आणि तो सारा छळ निमूटपणे सहन करणारी सोशिक सुशील सून असे द्वंद्व आपणांसमोर उभे केले आहे. आणि त्यातूनही आदर्श सुनेचेच एक लोभनीय पण करुण स्वरूप साकार केले आहे. तत्कालीन परंपराप्रिय समाजाला -- विशेषतः स्त्रियांना -- रुचतील, भावतील अशीच ही संसारचित्रे आहेत आणि ती रसाळ, प्रसन्न, शैलीत रेखाटलेली आहेत. त्यामुळे आठल्ये यांच्या या काव्यांना तात्काळ आणि अपरंपार लोकप्रियता लाभली, त्यातले वेंचे मुलींच्या क्रमिक पुस्तकांतून घेतले जाऊ लागले. नवविवाहित मुलींना भेटीदाखल ही काव्ये देण्याचा प्रघात पडला. त्यांतले अनेक श्लोक स्त्रियांच्या तोंडी खेळू लागले आणि त्यांच्या आवृत्त्यांवर आवृत्त्या निघाल्या !

नववधूंना आणि गृहिणींना उपदेश करणारी या प्रकारची अनेक पुस्तके त्या काळात प्रकाशित होत होती. ती काळाचीच एक गरज व मागणी होती. काशीबाई कानिटकर, यशोदाबाई भट, गिरिजाबाई केळकर, काशीबाई हेर्लेकर या तत्कालीन विदुषींनी अशी पुस्तके लिहिलेली आहेत. फार काय, हरिभाऊ आपटे यांनीही 'सगुणाबाईंची आपल्या मुलीस पत्रे' या नावाने एका आदर्श मातेने सासरी नांदणाऱ्या आपल्या तरुण व अननुभवी कन्येला केलेला पत्रात्मक उपदेश लिहिला आहे. परंतु या प्रकारच्या सर्व पुस्तकांमध्ये आठल्ये यांची ही तीन कथाकाव्ये आपल्या वाङ्मयीन गुणवत्तेने वेगळी उठून दिसतात. एक तर वर सांगितलेली सर्व पुस्तके गद्य आहेत. आठल्ये यांची पुस्तके काव्यरूप आहेत. त्यामुळे ती पाठांतरसुलभ म्हणून लोकांच्या स्मरणात खोलवर ठसली. दुसरे म्हणजे आपल्या दैनंदिन अनुभवांशी आणि प्रपंचात हरघडी भेटणाऱ्या विविध घटनांशी आठल्ये यांनी आपले असलेले अनुसंधान कुठेही सुटू दिलेले नाही. हाही त्यांच्या पृथगात्मतेचा एक ठळक विशेष आहे.

शेवटी एका प्रश्नाचा विचार करायला हवा. आठल्ये यांची ही तिन्ही कथाकाव्ये एके काळी खूप लोकप्रिय असतीलही; पण आज ती कालबाह्य झालेली नाहीत काय ? त्यात रंगवलेले वातावरण, कुटुंबव्यवस्था, व्यक्ती आणि एकूण

चालीरीती यांचे आजच्या काळाशी काही नाते आहे का ? आजच्या वाचकांना ती रोचक वाटतील का ? या प्रश्नाचे उत्तर होकारार्थी द्यावे लागेल. एक तर आठल्ये यांच्या अतिशय प्रसन्न आणि रसाळ शैलीमुळे या काव्यांतील रंजकतेचे व कलात्मक सौंदर्याचे मूल्य आजही उणावलेले नाही. उलट त्यांच्या कालिक संदर्भामुळे त्यांना आज एक वेगळीच वाचनीयता लाभलेली आहे असे दिसून येईल. हरिभाऊ आपटे यांच्या 'पण लक्षात कोण घेतो ?', 'मायेचा बाजार', 'भयंकर दिव्य' सारख्या सामाजिक कादंबऱ्या, देवलांची 'शारदा' किंवा 'संशयकल्लोळ' सारखी नाटके आज ज्या आवडीने व कुतूहलाने वाचली जातात तेच वाङ्मयीन आणि सामाजिक महत्त्व आठल्ये यांच्या या काव्यांना आहे.

आणखी एक गोष्टं ध्यानात घ्यायला हवी. ती ही की, एकूण मराठी स्त्रीजीवनाच्या अभ्यासात आणि आकलनात या काव्यांमुळे फार मोठी भर पडल्याचे आपल्या प्रत्ययाला येते. दलित साहित्य, ग्रामीण साहित्य यांचा आज जसा बारकाईने विचार होत आहे त्याप्रमाणे स्त्रीविषयक साहित्याचाही पुनर्विचार करण्याची गरज अभ्यासकांना भासू लागली आहे. स्त्रीजीवन हा आज संशोधनाचा, अभ्यासाचा, नवनव्या निष्कर्षांप्रत येण्याचा एक महत्त्वपूर्ण विषय म्हणून मुंबई, एस.एन.डी.टी. यांसारख्या विद्यापीठांनी आवर्जून स्वीकारला आहे. अशा अभ्यासाला, सामाजिक चिंतनमननाला आठल्ये यांची ही काव्ये फार महत्त्वाचे योगदान करतील यात शंका नाही.

म्हणूनच त्यांचे पुनर्मुद्रण करून ती वाचकांना उपलब्ध करून देणारे साहित्य प्रसार केंद्राचे श्री. मोरेश्वर पटवर्धन यांनी एक मोलाची कामगिरी बजावली आहे आणि मराठीतल्या स्त्रीजीवनविषयक साहित्यातली एक मोठी त्रुटी भरून काढली आहे. त्यांचे हे कार्य केवळ वाङ्मयीन नव्हे तर ऐतिहासिक आणि वैचारिकही आहे. त्याबद्दल त्यांचे अभिनंदन केले पाहिजे.

**शांता ज. शेळके**

[ शार्दूलविक्रीडित ]

आलें मूळ म्हणोनियां प्रथम जैं कन्या निघे सासरीं
माता घालुनि भूषणें म्हणतसे "सांभाळ तोडे सरी"
भाला कुंकुम लावुनी फळ नवें ओटीमधें घातलें
बाला सद्गद होय अश्रुजलही गालांवरी पातलें ॥ १ ॥

[ मंदाक्रांता ]

"आई येतें" हळुच वदली शब्द कांहीं फुटेना
मातृप्रेमा मृदुतरमना यत्न केल्या सुटेना
मातेलाही गहिंवर फुटे कंठ आला भरून
स्नेहें सांगे मधुर वचनें घट्ट पोटीं धरून ॥ २ ॥

[ शिखरिणी ]

"नको वाटूं देऊं तिळभर मुली वाइट मना
नको कष्टी होऊं उशिर बहु होईल गमना
तुला संक्रांतीला अणविन बये मी झडकरी
पुशीं बाळे डोळे किमपि हृदयीं दुःख न करीं ॥ ३ ॥

तुझी सासू साध्वी बहु सदय गे फार सरळ
सुदैवानें लाभे जगतिवर जी जोड विरळ
सदा 'लक्ष्मी लक्ष्मी' म्हणुनि तुजला कौतुक करी
धरीं प्रेमा तूंही मजसम सुखानें तिजवरी ॥ ४ ॥

[ शार्दूलविक्रीडित ]

केलें रक्षण लाडके अजवरी मीं जन्म तूतें दिला
जन्माची सगळ्या धनीण परि ती सासूच आहे तुला

देणें जें सुखदुःख तें तिजकडे आहे पहा, ह्यावरी
आई तीच खरी तुझी समजुनी दुःखास ह्या आवरीं ॥ ५ ॥

[ मंदाक्रांता ]

मोठ्या खोट्या, छलक, कुमती, बोलती दुष्ट वाचा
बोभाटा हा अजवरि जगीं गाजतो सासवांचा
ऐशा खोट्या विपरित मिषें तूं न चित्ता विटाळीं
एक्या हातें कधिंतरि मुली वाजते काय टाळी ? ॥ ६ ॥

[ पृथ्वी ]

सुशब्द वदतां प्रतिध्वनि उठे तयासारखा
वदेल कटु तो तया खचित होय कीं पारखा
स्वयें विनय ठेवितां सहजही पुरे कामना
तिरस्कृति न का घडे दुखवितां जनांच्या मना ? ॥ ७ ॥

[ शार्दूलविक्रीडित ]

मर्यादा धरणें, स्वकार्य करणें, साधेपणें वागणें
'द्या द्या वस्तु' म्हणोनियां नच कधीं कोणासही मागणें
जें पानावरती पडेल समयीं नेमस्त तें भक्षणें
हीं लोकप्रिय व्हावयास बरवीं आहेत गे लक्षणें ॥ ८ ॥

[ स्रग्धरा ]

सर्वांआधीं उठावें, स्मरण धरुनियां मागुनी त्वां निजावें
वस्त्रांपात्रां जपावें, कधिं नच पुसल्यावीण बाहेर जावें,
कामींकाजीं श्रमावें, अळस करुनियां त्वां न कोठें गमावें
सद्ग्रंथानें रमावें, शयनि पहुडतां श्रीहरीतें नमावें ॥ ९ ॥

[ शार्दूलविक्रीडित ]

हर्षें काम करीत जा झडकरी होईल जें जें तुला
सासूच्या घरच्या, धरूनि ममता, सांभाळ साऱ्या मुलां
येतां झोंप तयांस नीट निजवीं गाणीं मुखें गाउनी
किंवा घेउनि खेळवीं कटिवरी सद्वस्तुतें दाउनी ॥ १० ॥

'हें तों नित्य रडे, सदा धडपडे, हें शेंबडें, मेकडें
हें आहे चिपडें, क्षणक्षणिं पडे, बोले महावाकडें
डोक्याला खवडे, बसे नच कडे, छांदिष्ट मोठें कुडें
हें मारूनि खडे, किती बडबडे, फाडीतसे आंगडें ' ॥ ११ ॥

ऐसें बोलुं नये, कधीं विटुं नये, कोणास मारूं नये
किंवा त्यांस 'अरे तुरे' म्हणुनिही रागें झुगारूं नये
बोलोनी बहु गोड कोड पुरवीं, केव्हां वदें बोबडें
पक्ष्यांना पशुंना सुशील शिशुंना सर्वांसही आवडे ॥ १२ ॥

स्नानें घालुनि रोज निर्मल मुलें ठेवीत जावीं बरीं
वस्त्रें देउनि घेउनी पुनरपी तीं ठेव खुंटीवरी
जागा, देह, मुलें मलीन असणें मोठें असे दूषण
नाना रोग हरूनि निर्मळपणा होतो महाभूषण ॥ १३ ॥

[ भुजंगप्रयात ]

सकाळीं मुली काढुनी केरवारे
गृहा सारवोनी करीं स्वच्छ सारें
फुलें स्वस्तिकें रांगुळीचीं लिहावीं,
अशीं कीं जनें कौतुकें तीं पहावीं ॥ १४ ॥

निगा चांगली राख वृंदावनाची
जया पाहतां तृप्ति व्हावी मनाची
फुटोनी तरू येत जेव्हां बहार
फुलें वेंचुनी गुंफ तूं लांब हार ॥ १५ ॥

[ इंद्रवज्रा ]

वेणी बरी घालुनियां सकाळीं
अत्यादरें कुंकुम लाव भाळीं
मोठें नसावें टिकली नसावी
लोकांमध्यें सज्जनता दिसावी ॥ १६ ॥

[ भुजंगप्रयात ]

किती घालिती कंचुकी फार तंग
तसे तूं नको दाखवूं रंगढंग
धरावी तुवां रीत नेमस्त साधी
बरें वागुनी कीर्तितें नित्य साधीं ॥ १७ ॥

नको फार हव्यास गे, भूषणांचा
धरीं लोभ चित्तीं सदा सद्‌गुणांचा
पती-शुश्रुषा बोलणें नम्र वाचे
अलंकार हे जाण तूं बायकांचे ॥ १८ ॥

[ स्रग्धरा ]

पक्वान्नें, शाक भाज्या, रुचिकर चटण्या, रायतीं, भात नाना
कार्यप्रस्थीं करोनी बहुत चतुरता दाखवावी जनांना
टोप्या कुंच्या शिवाव्या परकर, अवघीं सारुनी सर्व कामें
द्यावा सद्बोध बालां, कधिंच बसुं नये बायकांनीं रिकामें ॥ १९

सांगाव्या भूपतींच्या अति सुरस कथा शूरशा राउतांच्या
खोट्या गोष्टी न सांगें भयजनक अशा राक्षसांच्या, भुतांच्या
नीतीचें सार घेईं निवडुनि बरवें दुग्ध जैसा मराळ
येरंडाचें, नको गे निजमुख शिणवूं, गाळुनीयां गुऱ्हाळ ॥ २० ॥

[ भुजंगप्रयात ]

सतीला पतीवांचुनी देव नाहीं
असो नित्य चित्तीं तुझ्या भावना ही
मणाची बिडी बोलती हा विवाह
परी जाण तो अमृताचा प्रवाह ॥ २१ ॥

[ उपजाति ]

सद्बोध लग्नांतिल जो पतीचा
तो जीव कीं प्राण असे सतीचा
अत्यादरानें शिरिं तो धरावा
पुनःपुन्हा हृत्कमलीं स्मरावा ॥ २२ ॥

[ शार्दूलविक्रीडित ]

लग्नाच्या घटिका भरोनि समयीं सारीच घाई उडे
विप्रांचा बहुमोल बोल न पुरा ऐकावया सांपडे
मंत्रांचा सरलार्थ तैं वधुवरां कोणी न सांगे खुला
तो मी सांगतसें मुली, परिस कीं कल्याणदाता तुला ॥ २३ ॥

बोले तैं पति, 'तूं मला वरुनियां अत्यादरें हे स्त्रिये
राहोनी मजसंगतीस चतुरे होणार वृद्धा स्वयें
ह्यासाठीं कर हा तुझा धरितसें सौभाग्य द्याया महा
देवांनीं गृहरक्षणार्थ तुजला स्वाधीन केलें पहा ॥ २४ ॥

अग्ने, प्रेम करी वधू अजवरी ही जन्मदात्यांवरी
मन्मातापितरांकडे मन तिचें ओढूनि घे सत्वरी
प्रेमा वाढवुनी सुखांत विलसो जोडोनि माझ्या कुला
होण्याला अनुरक्त नित्य मजला सद्बुद्धि द्यावी हिला ॥ २५ ॥

[ इंद्रवज्रा ]

ऋग्वेद तूं, मी तरि सामरूप
आकाश मी, तूं धरणिस्वरूप
अग्निद्विजांसन्मुख लग्न लावूं
निर्मूं प्रजा आणि सुखांत राहूं ॥ २६ ॥

[ उपजाति ]

परस्परें प्रेम सदैव ठेवूं
रूपें गुणें आवडतींच होऊं
सोडूनि वागूं कपटास हर्षें
वांचूं स्त्रिये शंभर पूर्ण वर्षें ॥ २७ ॥

[ द्रुतविलंबित ]

चढुनियां दगडावरती प्रिये
मन करीं दृढ तत्सम तूं स्वयें
अहित जे करिती त्यजुनी नया
करिं सदाचरणें वश तूं तयां ' ॥ २८ ॥

मिळुनि सात पदें जरि चाललें
उभयतां तरि सख्य घडे भलें
म्हणुनि सप्तपदीविधि तो सुखें
करुनि बोध करी पतिही मुखें ॥ २९ ॥

उपजतो नवधर्म पदीं पदीं
पुढति वाढत जाय जशी नदी
कथितसे पति तो प्रतिपाउलीं
परिस गे अति सादर तूं मुली ॥ ३० ॥

[ चामर ]

'चाललीस एक पाद आज माझियासवें
ह्यामुळें तुम्हां-अम्हांत सख्य जोडलें नवें
अन्नपूर्तता करीं सहाय होउनी मला
पुत्र फार ते शतायु देव देउं दे तुला ॥ ३१ ॥

[ कामदा ]

चाललीस तूं दोन पावलें
सख्य आपुलें वृद्धि पावलें
प्रेमबुद्धिची चढतसे कळा
वाढवीं स्त्रिये माझिया बळा ॥ ३२ ॥

तीन पावलें चालशी सखे
माझिया धना वाढवीं सुखें
चार पावलें चालशी बरीं
वाढवीं सुखा माझिया तरी ॥ ३३ ॥

पांच पावलें चालशी पहा
संततीस तूं वाढवीं महा
पावलें सहा चाललीस तूं
भोग दे जसे देति हे ऋतू ॥ ३४ ॥

[ भुजंगप्रयात ]

अम्हीं पावलें चालुनी आज सात
खरें सख्य तें रेखिलें मानसांत
बहु प्रीतिनें राहुनी नित्य भार्ये
गृहस्थाश्रमीं चालवूं सर्व कार्यें ॥ ३५ ॥

सदा देत जावा विचारास मान
समस्तांवरी दृष्टि ठेवीं समान
मला दुःखदातें करीं तूं न कृत्य
रहा तूं सुखें होय कल्याण सत्य ॥ ३६ ॥

[ इंद्रवज्रा ]

पाळीव माझे पशु आणि पक्षी
वेळेस त्यां देउनि भक्ष्य रक्षीं
संतुष्ट त्यांतें करुनी रहावें
केव्हां न तूं चंचलचित्त व्हावें ॥ ३७ ॥

वागें सदा ठेवुनि हें मनांत
होशील लोकप्रिय तूं जनांत
माथां तुझ्या कीर्ति धरील छत्र
भार्ये तुला होतिल दिव्य पुत्र ॥ ३८ ॥

[ स्त्रग्धरा ]

सासूला सासऱ्याला सविनय करुनी नित्य सेवा जपावें
होवोनी आवडीची बहुत उभयतांपासुनी मान पावें
वागें तूं शुद्धभावें समजुनि नणदा दीर जावा अभिन्न
राहें वाहें प्रपंचा मजसह सकलां ठेवुनीयां प्रसन्न ॥ ३९ ॥

[ इंद्रवज्रा ]

माझ्या सखे भूषण तूं कुलाचें
कल्याण हो नित्य तुझें, मुलांचें
आहेस तूं ह्या घरची धनीण
राहें सदा दक्ष परंतु लीन' ॥ ४० ॥

[ भुजंगप्रयात ]

पतीच्या-तुझ्यामाजि जो नेम झाला
नको बाध आणूं कधींही तयाला
जिवासारखा ठेवुनी अंतरांत
जपोनी सदा नीट वागें घरांत ॥ ४१ ॥

[ शार्दूलविक्रीडित ]

सेवावें वडिलांस भक्ति धरुनी आज्ञा धरावी शिरीं
जावा दीर बघूनियां पडुं नको तूं मत्सराच्या भरीं
ठेवीं चाकर-नोकरांवरि दया मातेपरी सर्वदा
पाहोनी धनवैभवा फुगुं नको गर्वाभिमानें कदा ॥ ४२ ॥

नीतीबोधक पुस्तकें निवडुनी वाचीत जावीं बरी
शृंगारात्मक नाटकें, जनकथा घेऊं नको तूं करीं
चाली मंजुळ लावुनी कधिं कधीं गाणीं म्हणावीं मुखें
केव्हां नूतन चित्तवेधक अशीं आंगें रचावीं सुखें ॥ ४३ ॥

[ वसंततिलका ]

आदाय पाहुनि मुली करिं खर्चवेंच
नाहींतरी पुढति येइल फार पेंच !

बारीक दृष्टि बहुधा पुरुषांत नाहीं
ती बायकांस धरणें बहु इष्ट पाहीं ॥ ४४ ॥

सारे घरांतिल गडी असती अनाडी
भाजीमधेंहि करिती बहुधा लबाडी
ह्याकारणें वजन-माप कधीं तपाशीं
घालूं नको जिकिर फार परंतु त्यांशीं ॥ ४५ ॥

त्यांनीं 'धनीण बहु दक्ष' असें म्हणावें
घेवोनि धाक ह्रदयीं वळतीस यावें
ठेवीं हिशेब जपुनी पुरवीं पदार्थ
होवो तुझें 'गृहिणि' नाम मुली यथार्थ ॥ ४६ ॥

बाजारभाव चढतो, पडतोहि केव्हां
तोटा नफा बघुनि साठिव धान्य तेव्हां
होईं उदार धन खर्चुनि योग्य काळीं
'आहे' म्हणूनि सहसा न करीं दिवाळीं ॥ ४७ ॥

[ मंदाक्रांता ]

थेंबें थेंबें भरुनि जलही सांठतो कीं तलाव
जोडोनीयां लघुलघु फळ्या होतसे भव्य नाव
पैसा पैसा जमवुनि तसा रंक होतो कुबेर
संसारीं हें समजुनि करीं योग्य तो फारफेर ॥ ४८ ॥

[ भुजंगप्रयात ]

यथाशक्ति हातें करीं दानधर्म
नसे थोर त्यासारखें पुण्यकर्म

अनाथास देतां घडे पुण्य फार
धरीं अंतरीं त्यांतलें एक सार ॥ ४९ ॥

कुलाचार ते चालवीं भक्तिभावें
नसे चांगलें ठेवणें त्यांस नांवें
स्त्रियांचीं व्रतें पाळ गे तूं सदैव
जिथें भक्ति तेथें वसे नित्य देव ॥ ५० ॥

[ शार्दूलविक्रीडित ]

शांती सोडुं नको, कधीं रुसुं नको, स्वच्छंद वागूं नको
लज्जा सांडुं नको, उगी बसुं नको, कोणास मागूं नको
रागें बोलुं नको, अढी धरुं नको, चोरून खाऊं नको
कोठें जाउं नको, परस्थ पुरुषां पाहून हांसूं नको ॥ ५१ ॥

[ शिखरिणी ]

स्त्रियांना ह्या लोकीं समज पति हा देव पहिला
तयायोगें पावे सकल सुख सौभाग्य महिला
तयाच्या आज्ञेला निशिदिनिं मुली तत्पर रहा
धरीं प्रेमा चित्तीं तनमन सुखें त्यासचि वहा ॥ ५२ ॥

नसे पातिव्रत्यासम युवतिंना धर्म जगतीं
पतीच्या सेवेनें इहपर मिळे उत्तम गती
जरी एक्या चित्तें पति-युवति संसार करिती
तरी स्वर्गापेक्षां सुखनिधिस येईल भरती ॥ ५३ ॥

[ मंदाक्रांता ]

कोणी कोणी गुरु करुनियां गुप्तसा मंत्र मागे
कोणी 'बोवा' म्हणुनि नमुनी नित्य पाठीस लागे
चित्तीं आणीं सकल परि तो व्याप आहे ठगांचा
नाहीं बाई, अनुभव तुला पूर्ण आला जगाचा ॥ ५४ ॥

[ भुजंगप्रयात ]

अशांच्या नको लागुं तूं व्यर्थ नादा
अपेक्षीं सदा त्वत्पतीच्या प्रसादा
तया सेवुनी घालुनी गोड अन्न
बरें वागुनीयां करीं सुप्रसन्न ॥ ५५ ॥

[ वसंततिलका ]

ज्या ज्या स्त्रिया पतिवरी धरितात भक्ती
लाभे तयांस जगतांतचि मोक्षमुक्ती
ह्याहूनियां अधिक तें तुज सांगु काई
घेई जनाकडुन तूंहि भली भलाई ॥ ५६ ॥

आला चुकून पतिच्या जरि कोप चित्तीं
मानूं नको विषम तूं धरिं शांतवृत्ती
वेळीं तयाकडुनियां अपमान झाला
सोशीं, नको उलट उत्तर देउं त्याला ॥ ५७ ॥

ओढाळ फार मन हें करि सत्यनाश
लावूनि बद्ध करिं त्यास विवेकपाश
जें जें मिळेल तुज त्यांतचि तृप्त राहें
जें सौख्य तें सकल ह्यांतचि सत्य आहे ॥ ५८ ॥

[ मालिनी ]

उशिर बहुत झाला जा बसें वाहनांत
तिळहि धरुं नको गे, खेद आतां मनांत"
जननि-चरण कन्या वंदुनी दूर जाय
फिरुनि फिरुनि पाहे नेत्र लावूनि माय ॥ ५९ ॥

रडुनि रडुनि डोळे लाल झाले मुलीचे
कवण कथिल सारें दुःख त्या माउलीचें
हळु हळु मग कन्या नीट मार्गास लागे
पुशित पुशित डोळे पातली माय मागें ॥ ६० ॥

## ‘सासरची पाठवणी’ या पुस्तकाच्या आम्हाला मिळालेल्या आवृत्तीत टीपा दिल्या आहेत, त्या पुढीलप्रमाणे आहेत :

| श्लोक क्रमांक | टीप |
| --- | --- |
| १२ | सुशील : उत्तम स्वभाव, हा पशुपक्ष्यांना व मुलांनाही आवडतो. |
| २३ | आश्वलायन विवाहपद्धतीच्या विवाहहोमप्रकरणांतील ज्या मुख्य ऋचांच्या आधारानें पुढील श्लोक केले आहेत त्यांचें दिग्दर्शन ऋचांचे आरंभ देऊन टीपेत केले आहे. |
| २४ | गृभ्णामि ते ० |
| २५ | अर्यमणं नु देवं ० |
| २७ | अमोहमस्मि ० |
| ३१ | इष एकपदी भव ० |
| ३२ | ऊर्जे द्विपदी भव ० |
| ३३. | रायस्पोषाय त्रिपदी भव-मायो-भव्याय चतुष्पदी भव ० |
| ३४. | प्रजाभ्यः पंचपदी-ऋतुभ्य; षट्पदी ० |
| ३५. | सखासप्तप ० |
| ३६, ३७. | आन: प्रजा ० |
| ३७. | अघोरचक्षु ० |
| ३९. | सम्राज्ञी ० |



आई न्यावें सुनेला प्रथमचि म्हणती मान्यही त्यास वाचा ।।
न्यायें आहे तथापि तिजवरि तुमचा सर्वथा आज ताबा ।।

[ शार्दूलविक्रीडित ]

होती आंग धुवावयास बसली जों सून अंत:पुरीं
आला ओळखिचा तिच्या मधुरसा तों शब्द कानावरी
ओलें सोडुनियां निघे लगबगा, आशा-तरू वाढला
दाराआडुनि पाहते तंव दिसे दादाच कीं आपला ॥ १ ॥

झाले येउनियां जिला दिन बहू माहेरुनी सासरीं
डोळे लावुनि बैसली म्हणुनियां जी चातकाच्या परी
पाहोनी निज बंधु पूर चढला प्रेमाश्रुंचा लोचनीं
झाली सद्गद, कामधाम तिजला कांहीं सुचेना मनीं ॥ २ ॥

भाऊ येउनि आंत हांसुनि पुसे "आहेस बाळे ! बरी ?"
बोले "होय" हळूच सस्मित मुखें लाजोनि जाई दुरी
"भाऊ काय पितो चहा तव मुली ?" सासूहि ऐसें वदे
"आलासे दमुनी तया झडकरी कांहीं फराळास दे ॥ ३ ॥

किल्ल्या घे फडताळ तूंच उघडीं, लाडू चिरोटे वड्या
चांदीच्या तबकांत ठेव भरुनी, दे भाकरी त्या गड्या
साधे सर्व तुला महा चतुर तूं जा पेटवीं लौकरी
'स्टो' का 'फो' नकळे, तयावरि चहा, सांजाहि ताजा करीं " ॥ ४ ॥

पाणी पाय धुवावयास दिधलें वाढूनियां सत्वरी
प्रेमें येउनि बैसतां, हरखली, भाऊहि पाटावरी
कोणी ना जवळी बघून पुसलें त्या वाढतांना दहीं
"आई तात खुशाल बाळ बगडी आहेत ना सर्वही ? ॥ ५ ॥

[ मंदाक्रांता ]

चाले का तो दुडदुड अतां आपुला बाळ पायीं ?
'बाबा आई बगडि,' म्हणतां होतसे कोण घाई !
नाना बी. ए. नरहरि विनू जाहले काय पास ?
"वैनीलाही," स्मितमुखि म्हणे "ऐकिलें, चार मास" ॥ ६

[ शार्दूलविक्रीडित ]

"बाळे ! ठीक खुशाल सर्व असती वाहूं नको काळजी
झाले पास समस्त ईश्वरकृपें कामें मिळालीं दुजीं
आंबेही पिकले, गहूंहि विकले, कांहीं नसे गे ! कमी
इत्थंभूत घराकडील तुजला आहेच कीं बातमी ॥ ७ ॥

मामाजी म्हणतात 'घेउन चला' मामीहि मोठ्या भल्या
त्यांना त्या प्रतिकूल हें नच घडे, दैवें तुला लाभल्या
वर्षानें यजमान काल तुमचे सुट्टींत आले घरीं
धाडायास गमेल काय न कळे त्यांच्या परी अंतरीं ॥ ८ ॥

कामेंही नडिचीं घरीं जरि तरी आलों तुला न्यावया
आतां पाहु कसा रुकार मिळतो सर्वां जनांचा तया"
"मातें घेउन जा कसें तरि करीं जाऊं नको एकला
जाशी या उपरी तरी मग पहा ही आण माझी तुला" ॥ ९ ॥

"पाहूं या जुळतें कसें" म्हणुनियां तो जावयाला निघे
आले घेउनि मेहुणे तंव तिथें भेटीस दोघे तिघे
गेली बोलत मंडळी तिजसवें भाऊहि माडी चढे
बाला तल्लिन जाहली दिसतसे माहेर डोळ्यांपुढें ॥ १० ॥

झाला हर्ष मनांत फार तिजला कांहीं निराशा परी
कीं आले पति आपुले फिरुनियां फारा दिसांनीं घरीं
झालों तृप्त न दर्शनें उभयतां सेवा न झाली करें
नाहीं भाषण ऐकिलें मधुर तों जाणेंहि नाहीं बरें ॥ ११ ॥

मातृप्रेम खरेंच थोर पतिचें होतें परी झांकलें
ओढी लागुनि दोनिही मन जिचें दोहींकडे फांकलें
चिंताग्रस्त तटस्थ जी क्षणभरी राहूनि चित्रापरी
आली शीघ्र पुन्हां विवेक करुनी ती देहभानावरी ॥ १२ ॥

[ स्रग्धरा ]

सासू आली बघोनी, झडकरि मग ती लागली कामकाजा
तीही बोले, "मुलांना प्रथम तरि मुली ! जेवणें घाल जा जा
भाज्या ताज्या चिरूनी, खलुनि मग मला दे बघूं केशरातें
हाताखालीं सखूच्या त्वरित तुळशिला वाहुनी मीहि जातें" ॥ १३ ॥

होतां सारी तयारी झडकरि मुलगी ओळिनें पाट मांडी
चांदीचीं काढुनीयां धुउनि भरुनियां ठेविलीं नीट भांडीं
साऱ्या पीतांबरांच्या करुनि वरि निऱ्या ठेवि नेसावयाला
पेई कोशिंबिरी जी बहुविध चटण्या शीघ्र वाढावयाला ॥ १४ ॥

[ शार्दूलविक्रीडित ]

आले नेसुनि सोंवळें, समवयी दोघेहि ते मेहुणे
विद्यारूपगुणें निरालसपणें जे सारखे सद्गुणें
हौसेनें जंव इंग्रजी उभयतां बोलावया लागले
पाहोनी तंव दक्ष लक्ष पतिचें पत्नीकडे वेधलें ॥ १५ ॥

"नोहे ही गजगामिनी," मनिं म्हणे, "माझी प्रिया कामिनी
स्वर्गांतूनि खरोखरीच उतरे प्रत्यक्ष सौदामिनी
मर्यादेस धरून वागत असे पाहोनि माझा कल
माहेरीं लिहिते प्रसन्नवदना पत्रें किती कोमल ॥ १६ ॥

नाहीं ओळख धीर देउनि मना राहे तरी नावरे
हाहा ! सुंदर मंदिरांत अमुच्या ही इंदिरा वावरे
रत्नाचा असल्या वियोग मजला होणार थोडा तरी
साहूं राहुन एकटा तरि कसा ? ही काळजी अंतरीं " ॥ १७ ॥

भाऊ हांसुनि इंग्रजींतुनि पुसे, "कां रावजी स्वस्थसे ?
एकाकी सुचला विचार कसला ? वृत्ती न चित्तीं वसे"
"छे ! छे ! नाहिं" म्हणे, "उगाच अपुलीं हीं लोणचीं रायतीं
आली पाहुन कल्पना सहज कीं मोजूं बरीं आयतीं" ॥ १८ ॥

"वा ! वा ! राव अम्हास थाप दिधली खाशी भली चांगली
मोजायास्तव आज काय वरतीं आणून तीं टांगलीं ?"
आले शब्द गळयांत उत्तर तया द्यायास कांहीं नुरे
"भाऊ माफ करा जरा" म्हणति ते, "दुर्लक्ष झालें खरें" ॥ १९ ॥

ऐसा हास्यविनोद चालवुनियां ते एकमेकांप्रती
"घ्या हो घ्या" अति आग्रहास करुनी वाढावया लाविती
मध्यें चोरुनि पाहती हळुच तों पत्नीकडे रावजी
प्रेमाचा सुचवी प्रसन्नवदना नेत्रांबुजें भाव जी ॥ २० ॥

आनंदांत मजेंत भोजन असें थाटांत झालें पुरें
आले आंचवुनी घरांत सगळे नेसावया धोतरें

तों एका तबकांत कातरविडे खासे फुलांचे तुरे
ठेवी ती तरुणी पुढें बहुगुणी आणोनि मोठ्या त्वरें ॥ २१ ॥

पाहोनी मुलिची कलाकुशलता सारे महा कौतुकें
माना डोलवुनी मनांत म्हणती, "केव्हां कधीं ही शिके ?
रांगोळ्या कशिदा सुरेख झबलीं कुंच्या मुलांच्या करी"
मामाजी म्हणतात, "अक्षर लिही ती शुद्ध मोत्यांपरी ॥ २२ ॥

आर्या, श्लोक, पदें स्वयें रचितसे सर्वांमधें पारखी
बोले मंजुळ फार फार विनयें प्रौढ स्त्रियेसारखी
सर्वांशीं बहु गोड कोड पुरवी कोणा न दे दूषण
झाली भाउ ! खरोखरीच अमुच्या वंशास ही भूषण" ॥ २३ ॥

[मंदाक्रांता]

सासू प्राणापरिच समजे सून तैशीच जाऊ
मामांजी तों म्हणति, "इजला ठेउं कोठें न ठेऊं ?"
"वैनी वैनी" करिति नणदा, लोभ साऱ्या दिरांचा
"लक्ष्मी झाली कळस" म्हणती, "आपुल्या मंदिराचा" ॥ २४ ॥

बोलोनी त्यां सुजनपण दे भाउ अन्य प्रकारें
"ज्याला त्याला निजसम जनीं वाटती लोक सारे
तुम्हीं सारे सुजन म्हणुनी होतसे तीहि मान्य
केलें आम्हां, मुलिस पदरीं घेउनी, धन्य धन्य" ॥ २५ ॥

घालोनीयां वदनि मग ती मंडळी तांबुलांस
गेली घेतां परिमळ करें, बैठकीच्या स्थळास
कोणी पाहे वरिवरि बुकें चाळुनी वृक्ष, पक्षी
कोणी कोणी हळु हळु करूं लागले वामकुक्षी ॥ २६ ॥

होतां होतां सकळ इतुकें जाहले तास बारा
मागूनीयां बहुत पडला बायकांचा पसारा
जेवायाचा तदुपरि गड्या-माणसांचा विचार
झाकापाकी सकल करितां वाजले तीनचार ॥ २७ ॥

लागे डोळा थकुनि पडतां सासुचाही जरासा
वाचायाला बघुनि मुलगी ग्रंथ घेई बरासा
माहेरानें मन गुतविलें बंधु आला समक्ष
ऐशावेळीं क्षणभरि तिचें काय लागेल लक्ष? ॥ २८ ॥

[ वसंततिलका ]

"लावूनि लक्ष जननी बसली असेल
जातां न मी मजवरी वहिनी रुसेल
जावें क्षणांत उडुनी गमतें मनाला
नाहींत पंख मज काय करूं तयाला? ॥ २९ ॥

आतां मना करिशि कां मज सांग घाई ?
लग्नाक्षताच 'विसरें' म्हणतात, 'आई'
गर्जे, म्हणे मुलिस 'तूं परकीय,' ताशा,
'माहेरची धरिशि कां मग व्यर्थ आशा ?' ॥ ३० ॥

दावें धरून जिकडे वळवाल गाय
कां कूं कधीं न करितां तिकडेच जाय
घालाल तेंच बहु गोड करून खाय
देतां दुधास न म्हणे परि रंक-राय ॥ ३१ ॥

[ इंद्रवज्रा ]

तैशी मुलीचीहि गरीब जात
देती जयाला तिकडेच जात
श्रीमंत हो तो अथवा भिकारी
कीं अंध पंगू जड षड्विकारी ॥ ३२ ॥

[ मंदाक्रांता ]

जेऊं घाला सुरस अथवा जेवणावीण ठेवा
जाळा, पोळा, तरिहि करिते भक्तिनें भर्तृसेवा
त्याच्या मागें करिति विधवा, अन्न देती न पोटा
देवा देवा ! खचित मुलिचा जन्म हा फार खोटा ! ॥ ३३ ॥

[ शार्दूलविक्रीडित ]

देवानें तर तोच जन्म मुलिचा मातें दिला भूवरी
ठेवोनी मग शब्द काय फळ तें होणार त्याच्यावरी ?
त्याचा तो महिमा अगाध म्हणती, कैसा कळे आपणा ?
देवानें दिधल्या स्थितीस विटणें हा शुद्ध वेडेपणा ॥ ३४ ॥

माझे तों पति सुस्वरूप, शिकले, ज्ञाते, गुणी, जाणते
सासू प्रेमळ, सासरा धनपती, आहे कमी कोणतें ?
माझ्या नाखुषिला खरी तिळभरी जागा न ठेवी हरी
आतां निर्मळ वागणें जपुनि हें कर्तव्य माझ्या शिरीं ॥ ३५ ॥

[ वसंततिलका ]

विश्वास ह्या सकल ईश्वर तात, माता
सर्वांस तोच करुणार्णव बुद्धिदाता

त्याची अगाध न कळे कवणास लीला
तो काय पार न करील मला मुलीला ? ॥ ३६ ॥

[ भुजंगप्रयात ]

हरीच्या वरी सर्व माझा हवाला !
असे मान्य मी काय होईल त्याला"
विचारें अशा लोचनीं येत पाणी
पुराणांतलीं जाति वांगीं पुराणीं ॥ ३७ ॥

[ मालिनी ]

कठिण कठिण लोकीं फार हा मोहपाश
कितितरि मुनि झाले तोडतांना निराश
चिकटुनि बसती त्या साधुही जाड जाड
शिशुसम अबलेचा त्यांपुढें काय पाड ? ॥ ३८ ॥

[ शार्दूलविक्रीडित ]

"ऐकावा तरि काय बेत ठरतो" वाटे, परी फार भी
धैर्यातें धरुनी जिन्यांत तरि ती जाऊनि राहे उभी
दोघांचा तंव चालला हळु हळू संवाद कानीं पडे
ऐके देउनि कान सर्व मन तें लावूनि त्याच्याकडे ॥ ३९ ॥

[ स्रग्धरा ]

"बोला हो राव ! बोला, झटपट करुनी काय तें स्पष्ट सांगा
आणायाला गड्याला, हळुहळु म्हणजे, सांगतों शीघ्र तांगा
आई 'न्यावें सुनेला' प्रथमचि म्हणती, मान्यही त्यास बाबा
न्यायें आहे तथापी तिजवरि तुमचा सर्वथा आज ताबा" ॥ ४० ॥

"न्यायाचाही तराजू धरुनि निजकरें बोलतां फार नामी
भाऊसाहेब ! आहें जनकजननिच्या काय बाहेर हा मी ?
मामा तों वृद्ध, मामी बहुबहु थकल्या, भेटणेंही मुलांस
जाणें हें उक्त, यावें लवकर, म्हणजे प्रश्न झाला खलास" ।। ४१ ।।

ऐकोनी उत्तरातें सुखकर, मुलिच्या हर्ष मावे न पोटीं
चित्तीं वाटे पतीची मधुरतर किती बोलण्याची हतोटी
आतां येथून जावें निघुनि पलिकडे स्वस्थ चित्तें निजावें
वाटावें बंधुला कीं खचित जणुं हिला नाहिं कांहींच ठावें ।। ४२ ।।

"बाळे ! बाळे !" म्हणोनी लगबग तंव तो भाउही येत मागें
घाई झाली अशी कीं वरुनि उतरतां त्याजला ठेंच लागे
मागें पाहे, "अगाई" म्हणुनि मग पुसे, "लागलें काय भारी ?"
"नाहीं नाहीं कशाचें, झटपट कर जा आपुली तूं तयारी ।। ४३ ।।

[ मंदाक्रांता ]

तांगा आला म्हणुनि समजें, रात्रिची मेल साधूं
बांधाबांधी झटपट करीं, लागतों मीहि बांधूं
आणीं पेटी उघडुनि डबा, जा कशी आंत शीर
कोठेंही जा सतत अपुला बायकांना उशीर" ।। ४४ ।।

बोले, "दादा ! गडबड तुझी ही अशी काय फार ?
सासूबाई निजुन उठल्या, त्यांस आधीं विचार"
त्याही आल्या, मुलिस म्हणती, "जा तयारीस लागें
नाहीं कांहीं फिरुनि उरलें सांगणें तें मला गे ।। ४५ ।।

पाणी प्याया मधुन तुजला ह्या धरीं चार गोळ्या
घे त्या साड्या, नविन शिवल्या, पैठणी आणि चोळ्या

दादापाशीं कुलुप करुनी दे डबा दागिन्यांचा
जागा रात्रीं, तिळभरि नसे नेम ह्या माणसांचा ॥ ४६ ॥

थंडीलाही जवळ असुं दे नीटशी एक बंडी
आंब्याचीही भरुनि शिवुनी ठेविली ही करंडी
पेढे, बर्फी, फणस, चिवडा देइं साऱ्या मुलांतें
आईलाही खण भरजरी हा तुझ्या देइं हातें" ॥ ४७ ॥

तांगा आला बघुनि जलदी अक्षता-कुंकुमातें
लावोनीयां, त्वरित पदरीं घातलें श्रीफलातें
ऐशा प्रेमें करुनि भरुनी जाहली सर्व ओंटी
दादा "बाळे," म्हणति वरुनी, "ही तुझी सर्व खोटी" ॥ ४८ ॥

"लक्ष्मी जाते" पुरुष म्हणुनी पोंचवायास आले
"या या दादा !" म्हणुनि कितिदां तैं नमस्कार झाले
सासू बोले, "बहुत पुसलें सांग आईस जातां
वाटेनें जा जपुनि, चढुनी बैस तांग्यांत आतां" ॥ ४९ ॥

सर्वांना ती नमन करितां बोलती "अष्टपुत्रा
सौभाग्यें हो पतिसह करीं नीट संसारयात्रा"
तांग्यामाजी बहिण बसली, बंधु होताच आंत
"मीही येतों" म्हणुनि चढले रावही जात जात ॥ ५० ॥

काढोनीयां तिकिट फिरती तोंच गाडीहि आली
जागा खाशी बघुनि बसती तोंवरी शीट झाली
जातां पाहे सजल, पतिला चोरुनी, लोचनानें
रावांनीं‌ही पथ सुधरिला खिन्न झाल्या मनानें ॥ ५१ ॥

[ स्रग्धरा ]

"पाहोनी वाट आई करिल कितितरी आंत-बाहेर खेपा
बाळें येतील 'ताई' म्हणत मजवरी घालुनी कोण झेपा
थट्टेनें लाजवीन प्रथम वहिनिला" हेंच घोळे मनांत
खाडी टाकून गाडी घडघडघड तों पातली स्टेशनांत ॥ ५२ ॥

[ मंदाक्रांता ]

गेली दारीं जंव, तंव मुलें खेळती आंगणांत
ताई आली बघुनि पळती सांगण्याला घरांत
दासी येई उतरुनि दहीं-भात टाकावयासी
हर्षे गेली चरण धुउनी आंत माहेरवासी ॥ ५३ ॥

आधीं केलें नमन वडिलां बोलती "बैस खालीं"
कोणी कोणी "बरिच" म्हणती, "जाउनी थोर झाली"
आईनें तों तिजसि पुसलें, "काय सारीं खुशाल ?"
"आशीर्वादें कुशल तुमच्या" ती म्हणे, "आजकाल" ॥ ५४ ॥

"घे घे घे घे" म्हणत जवळी बाळही शीघ्र आला
लागे "ताई" म्हणुनि बगडी तेथ नाचावयाला
पेढे बर्फी, जमवुनि मुलें, वांटली थोडथोडी
चुंबूनीयां "कितितरि" म्हणे, "लागते बाळ ! गोडी" ॥ ५५ ॥

[ शार्दूलविक्रीडित ]

वाढीं साजुक तूप तीस जननी, भातास गोडें दहीं
झालें जेवणखाण न्हाण बरवें हर्षोत्सवें सर्वही
प्रेमें फारच भेटली वहिनिला थट्टाहि झाली सुरू
लागे काम करावयास जरि ती बोले "नका हो करूं" ॥ ५६ ॥

[ स्रग्धरा ]

झाल्या दोघी रिकाम्या उरकुनि अपुलीं कामकाजेंहि सर्व
आनंदाचें सुखाचें अनुपम गमलें फार दोघींस पर्व
गोष्टी दु:खासुखाच्या पळहि न कथितां ठेविती ज्या रिकामें
दावीती एकमेकी वरचढ कशिदा काढलेलींहि कामें ॥ ५७ ॥

आई आली उठोनी हळुहळुच करूं लागली काडवाती
कन्या जावोनि तेथें निवडुनि बरवा घेत कापूस हातीं
लाडें लाडें म्हणे कीं "उशिर करिशि कां पाठवायास दादा ?"
"बाळे ! होता तयाला तरिहि घडि घडी रोज माझा तगादा" ॥ ५८ ॥

"आई दाही दिशा ह्या तुजविण मजला खास होती उदास
बाबा दादा मुलेंही स्मरुनि गमतसे हा नको बंदिवास
वाचोनी पत्र ताजें मधुर वहिनीचें हुंदका येत मोठा
वाटे ह्या बायकांचा खचित खचित कीं जन्म हा फार खोटा" ॥५९ ॥

[ शार्दूलविक्रीडित ]

"हा हा काय तुझा असा समज गे ! आहेस बाळे ! खुळी
सृष्टीचा क्रम हा असाच असतो आश्चर्य नाहीं मुळीं
आतां त्वत्पतिला पगार चढुनी येईल गे संपदा
दासी दासहि भूषणें चढवुनी तल्लीन होशी सदा ॥ ६० ॥

दैवें होइल पुत्ररत्न बरवें कुर्वाळितां त्या मुला
कैंचीं बंधु बहीण आणि वहिनी ! भ्रांती असे ही तुला !
संसारीं मन एक वेळ शिरल्या माहेर होतें शिळें
कोठेंही घन वर्षला तरि जगीं गंगेस गंगा मिळे" ॥ ६१ ॥

* *




।। नाहीं दुष्ट समस्तही गुण तिचे तोलावया तागडी ।।
।। सर्वांना छळिते घरीं नच टिके बाई न दाई गडी ।।

[ शार्दूलविक्रीडित ]

“राहूं दे सगळें करील वहिनी तूं बैस आतां जरा
आल्यापासुन वेळ तूं, मज यमू ! नाहींच झाला खरा
‘सासू खाष्ट तुझी’ अशी पडतसे कानांवरी आळ जी
ऐकोनी मजला, तशीच ‘तिकडे’, वाटे तुझी काळजी ॥ १ ॥

[ मंदाक्रांता ]

ऐसी कां तूं दिसतिस बरें ? काय होतें जिवास ?
किंवा नाहीं संवय म्हणुनी बाधला हा प्रवास !
गेलें सारें शरिर सुकुनी नेत्रही खोल खोल
ऐसें होतें तुज तरि यमू ! काय तें स्पष्ट बोल ॥ २ ॥

[ शार्दूलविक्रीडित ]

कां गे लंगडशी ? अशी दिसतसे कीं चालशी तूं बळें
हाताला दिसती तसेच कसले हे डाग काळेनिळे ?
वाटे पाहुनियां तुला मज गडे ! हें चिन्ह नाहीं बरें
नाना येउनियां विकल्प मन हें माझें कसें घाबरे ॥ ३ ॥

सासूला गुण हे तुझे अवडती किंवा करी राग ती ?
मामांजी करितात काय ममता ? वन्सें कशा वागती ?
जावा दीर समस्तही वदति कीं प्रेमेंकरोनी तुला ?
ऐकूं दे, मन मोकळें करुनि तूं हें सर्व सांगें मला” ॥ ४ ॥

[ स्रग्धरा ]

आईची प्रेमवाणी परिसुनि मुलिचे नेत्र आले भरून
मोठ्या कष्टें विचारें वदत हळुहळू हुंदका आवरून

"'श्रीमंती, नांव मोठें, खपति गडि किती, गोट तोडे करांत
आई ! कांहींच नाहीं तिळभरिहि कधीं न्यून ऐसें घरांत ॥ ५ ॥

[ शार्दूलविक्रीडित ]

आतां वाढिस लागल्यें, प्रथमही माझी तशी ठेवण
झालीं जागरणें, तशांत न मिळे वाटेमधें जेवण
झाले न्हाउनियां मला दिन बहू वेणीफणीही नसे
तेणें पाहुनियां तुला अजि अशी मी भागलेली दिसें ॥ ६ ॥

थंडी फार पडून पाय फुटले गेल्या तयांना चिरा
हाताला बहु फोड फोड उठुनी आल्या फुगोनी शिरा
बिब्ब्याच्या म्हणुनी फुल्या वर दिल्या ओतून त्या नासती
तेणें हे बहु डाग डाग पडले ऐसे तुला भासती ॥ ७ ॥

सासूबाइहि चांगल्या परि जरा आहेत त्या तापट
मामांजीस खरेंच सर्व गमतें त्यांचें, नव्हे पालट
वन्सें तों असती लहान अजुनी; माझ्याहि होती चुका
रागानें भरती मला म्हणुनि कां त्यां दोष द्यावा फुका ?" ॥ ८ ॥

[ स्रग्धरा ]

बोले जों तोंच आल्या अवचित बसण्या शेखदारीणबाई
आई "या या" म्हणे तों उठुनि यमुहि त्यां पाट दे घाइघाई
"आली केव्हां यमू ही ?" पुसुनि म्हणति त्या "क्षेम सर्वांमधील ?
राधाकाकू ! यमू तों खचित खचित हो फार मर्यादशील ॥ ९ ॥

[ शार्दूलविक्रीडित ]

शेजारास अम्ही कितीक महिने होतों हिच्या सासरीं
पाहें पुष्कळ मी मुली परि हिची नाहीं कुणाला सरी
नक्षत्रासम ही सुरेख सुगुणी जोडीच नाहीं जिला
पूर्वीं देव हिणें, परंतु गमतें, नाहीं बरा पूजिला ॥ १० ॥

कोठारें गडगंज सर्व भरलीं गोठ्यांत गाई म्हशी
वस्त्रें सुंदर दागिने परि पडे तेथें बिचारी फशीं
झाली काय दशा पहा तिळ नसे तोंडावरीही रया
हा हा ! काय वदूं तुम्हांस ? यमुची सासू नव्हे, कैकया ॥ ११ ॥

हुंडा देउनि मानपान करुनी केलीत शोभा किती
त्याची लेशभरी खरोखर नसे त्यांच्या मनाला क्षिती
आली सून घरीं सुरूप, शिकली, नाहीं परी आवडी
'झाला' सासु म्हणे मनीं 'फुकटचा तैनातिला हा गडी' ॥ १२ ॥

आहे ही शिकली सुजाण परि ती बोलेहि ना कौतुकें
जाणेना गुण लेशही परि हिचीं घेऊनि जाळी बुकें
थोराची मुलगी घरांत पडली त्याची नसे दादही
कैचें दूध दहीं, मुखें मधुरसा नाहीं कधीं शब्दही ॥ १३ ॥

[ स्रग्धरा ]

कन्येला प्राप्त व्हावें सुख म्हणुनि तुम्ही सोशिली फार झीज
रूपाची, सद्गुणांची तिळभरहि परी तेथ नाहींच चीज
सोन्याचा घांस वाटे विषसम, नसतां माणसें सुस्वभावी
सत्संगें स्वर्ग होतो गरिबिहि असतां वैभवाच्या अभावीं ॥ १४ ॥

[ मंदाक्रांता ]

नाहीं माया तिळभरि तिला शुद्ध चांडाळमूर्ती
मोठी खोटी छळकर बया गाजते हीच कीर्ती
कंटाळूनी झुरुनि झुरुनी जीव दे एक सून
देवोनीयां तुम्हिहि मुलगी खास गेलां फसून ॥ १५ ॥

तोंडीं चाले वटवट सदा नोवऱ्याशींहि भांडे
कापट्यानें अघटित रची नित्य नाना कुभांडें
अन्याची तों चुकुनिहि तिला लेश नाहींच जाण
सांगूं तुम्हां कितितरि तिचें फार मोठें पुराण ? ॥ १६ ॥

[ स्रग्धरा ]

शेळीच्या सारखी जी सतत चरतसे गोडघांशीं तुपाशीं
माराहाणी करोनी छळुनि छळुनियां सून ठेवी उपाशी
'हो हो हो हो' म्हणोनी पतिहि डुलवितो मान सोडोनि सैल
नादानें बायकांच्या पुरुषहि बनती वेसणी नंदिबैल ॥ १७ ॥

[ मंदाक्रांता ]

बाईला त्या निजुन उठण्या वाजती सात आठ
उष्णाला त्यापुढति बसते देउनी स्वस्थ पाठ
जेथें तेथें जमुनि धुळिचा पेर सांचूनि केर
तेथोनीयां उठुनि मग ती मांडिते थेर थेर ॥ १८ ॥

'गेलें सारें चुलित पडलें लागली त्यास आग
जा जा आतां उलथुन तिथें शेण खायास लाग
सोडीं वेणी लवकर फणी आणुनी येथ जाळ'
'गेली मेली' अशुभ असली नित्य तोंडांत माळ ॥ १९ ॥

भांडें कुंडें धुउनि पुसुनी ठेवि ना एक नीट
नासे खासें सतत उघडें राहुनी पीठ मीठ
सैंपाकाच्या चुलिवरि सदा लोंबती कैंक जाळ्या
दुर्लक्षानें सडुनि पडती मेथकूटांत आळ्या ॥ २० ॥

भांडीं कुंडीं बुरसट, सुतें लोणच्यामाजि सारीं
घाणेरें तें, बघुनिच मना, ताक, येई शिसारी
घालीना जी हतरुण कधीं लाविनाही पदास
सेवा सांगे पतिस उलटी, ठेविला जेवि दास ॥ २१ ॥

गोरी आहे वरुनि परि ती आंतुनी सर्व काळी
नांवें तीच्या रडुनि रडुनी सून ही अश्रु गाळी
पोरीचीं या छळुनि छळुनी काढिलीं शुद्ध हाडें
नेणों केव्हां धरुनि झिपरी देव घेईल झाडे ॥ २२ ॥

[ शार्दूलविक्रीडित ]

आली एक दिशीं बया लगबगा, होत्या पुढें बायका
'व्याह्याचा' वदली, 'निरोप अमुच्या आला असे आयका
"पाणी लांबुनि आणणें जड बहू, अभ्यास नाहीं तिला
ठेवा ब्राह्मण, हा पगार सगळा येथेंच आम्हीं दिला" ॥ २३ ॥

[ स्रग्धरा ]

कैसा आम्हांवरी हे धडधडित पहा चालवीतात जोरा
श्रीमंतीचा कशाला फिरफिरुनि असा दाखवीतात तोरा ?
ठेवाया ब्राह्मणाला निवळ समजती काय आम्हीं भिकारी ?
व्याह्यांच्या काय आम्हीं गरिब म्हणुनियां लागलों आज दारीं ? ॥ २४ ॥

[ भुजंगप्रयात ]

पगारांत त्या खर्चही भागला का ?
गिळाया तया कोण घालील काका ?
मुली लाडक्या आपल्या नित्य व्हाव्या
तरी पोसुनी भाविणी नाचवाव्या ॥ २५ ॥

जशाला तसें, मीहि कांहीं मऊ न
उपाशी तयाला दिला घालवून
अम्हांला नको कायदा हा नवीन
हव्या त्या रितीं मी तिला वागवीन ॥ २६ ॥

[ शार्दूलविक्रीडित ]

ऐसा पाठविणें निरोप कुजका त्यांनाच तो साजला
हा हा नाजुक पोर, काय पण ही रेडा जसा माजला
माझा बाळ सुरेख कोमल किती, हें रत्न त्या जोडिलें
वाळे धाक धरोनि ह्यास्तव तिचें मी मीठही तोडिलें ॥ २७ ॥

[ मंदाक्रांता ]

आताशां मी म्हणुनिच तिला आळणी जेउं घालीं
हेडंबीची तरिहि कमती मस्ति नाहींच झाली
झाली घोडी अवचित पहा न्हाण येऊन थोर
शोभे तीच्या पुढति अमुचा बाळ हा शुद्ध पोर ॥ २८ ॥

[ शार्दूलविक्रीडित ]

आतां जाउनि मीच नाजुकपणा सारा तिचा काढितें
हट्टें ऐन दुपारची नदिवरी पाण्यास मी धाडितें

"नाहीं, होय" म्हणेल ती तरि पहा देतें भल्या डागण्या
ताठा मोडुनि मांजरासम तिला लावीन मी वागण्या ॥ २९ ॥

बापाला लिहिते मला न कळतां चोरून पत्रें घरीं
"सासूही करिते तव्यावर उभी" ऐशा चहाड्या करी
आहे उर्मट दांडगी नच कधीं कांहीं कराया कळे
पोरींना जन हौशिनें शिकविती, हीं सर्व त्याचीं फळें ॥ ३० ॥

[ इंद्रवज्रा ]

मारूनि आतां कमरेंत लाता
देतें पहा जाउनि डाग हाता,
ऐसें वदोनी अपटीत पाय
रागें फणाणूनि निघून जाय ॥ ३१ ॥

[ मंदाक्रांता ]

छी थू केली हिणवुनि बहू तेथच्या बायकांनीं !
घेणारी ती परिसुनि परी बायको काय कानीं ?
मींही केले मन वळविण्या सर्व कांहीं इलाज
काडीचीही परि नच तिच्या मानसामाजि लाज ॥ ३२ ॥

[ शिखरिणी ]

उपाशीं ठेवोनी मुलिस वर भाजी अवदसा
फुटेना चित्ताला तिळभरि पहा पाझर असा
तिचीं कारस्थानें किતितरि तुम्हां सांगुं वयनी ?
शरीरीं कांटा ये बघुनि यमुचे हाल नयनीं ॥ ३३ ॥

[ शार्दूलविक्रीडित ]

पाण्याची भरलीहि घागर बया दे लाथडोनी बळें
'डोळे का फुटुनी' म्हणे, 'अवदसे ! झाले तुझे आंधळे ?
काळें तोंड करीं कपाळकरटे ! जा खेप आणीं दुजी
पाणी कोण भरील हें पसरलें ? येऊनि काकी तुझी ?' ॥ ३४

[ स्रग्धरा ]

पाण्याला धाडितां कां ? प्रखरतर किती ऊन ऐसें वदोन
आणोनीयां दिल्या मी लवकर भरल्या घागरी एक दोन
'लोकांचें घ्यावयाची संवय मज नको येवढी काय पाळी ?'
ऐसें बोलोनियां ती नदीवरि तिजला हट्टवादी पिटाळी ॥ ३५ ॥

पोरीला फोड येती तरतरुनि पहा नित्य भाजूनि पाय
दुःखानें त्या बिचारी ढळढळ रडते मोकली धाय धाय
'आई कीं बाप मेला ?' म्हणुनि पुसतसे, 'काय झालें रडाया ?'
देवा ! देवा ! नको ते फिरुनि मज तिचे शब्दही आयकाया ॥३६ ॥

[ शार्दूलविक्रीडित ]

सखबी ती तुमची विहीण असुनी जन्मूनि मोठ्या कुळीं
नाहीं थोरपणा, नसेच कृतिही मोठेपणाची मुळीं
माझें तोंड न जाहल्यावरि मिटे हें एकदाचें सुरू
निंदा ऐकुन राग येइल, परी मी काय त्याला करूं ? ॥ ३७ ॥

होती एक दिनीं निजून पडली होऊन बाहेरची
आधीं फार रडून आठवणही काढून माहेरची
पातेलींत उशाकडे नथ जरा काढून ठेवी करें
सासू येउनियां तिनें लपवुनी ती ठेविली सत्वरें ॥ ३८ ॥

जागी होउनि पाहते नथ पुन्हा तों ती न कोठें दिसे
'तेथें येउनि ह्यास कोण शिवलें ?' ऐसें मुलांना पुसे
सासू आयकतांच, काय पुसतां ! थैमान सारा करी
'वाटोळेंच करावयास्तव' म्हणे, 'आलीस तूं या घरीं' ॥ ३९ ॥

सासू तों चवथ्या दिशीं उजडतां गोठ्यामध्यें वांकुनी
भर्त्याला 'नथ घ्या' म्हणे 'म्हसणिनें येथें दिली टाकुनी'
कांहीं एक विचारतां न, सुटला मारीतही सासरा
कोणाचाहि बिचारिला मजविणें नाहीं तिथें आसरा ॥ ४० ॥

'भाज्या तूं करितेस फार अळणी, कंटाळती खावया
बापाचें खरचेल का, अधिक तें, गे ! मीठ घालावया ?
घे हें मीठ खुशाल घाल' इतुकें बोलून देई स्वयें
'वाटे फार' म्हणोनियां हळुहळू घाली बिचारी भयें ॥ ४१ ॥

'भाजी खारटघोट ही किति' म्हणे तों जेवितां सासरा
तेव्हां तीच म्हणे, 'सुमार हिजला कांहींच नाहीं खरा
घोडीला तिळमात्र अक्कल नसे हा शुद्ध आहे वळू'
'होतें ना दिधलें तुह्मींच मजला ?' हीही म्हणाली हळू ॥ ४२ ॥

'तोऱ्यानें वर आणखीं चुरचुरां बोले कशी ती पहा
सोसेना पुढती खरोखर 'म्हणे' ऐसा हिचा ताप हा'
स्त्रीच्या आधिन सर्वथैव नवरा सांगे तसा नाचतो
मारी तोहि गुरासमान, किति ती सोशील हो जाच तो ॥ ४३ ॥

आंबेमोहर भात बारिक असा, साजूकसें तूपही
घेई आपण वाढुनी पतिसवें मागून गोडें दहीं

बाकीच्यांस करीत भात असडी किंवा शिळी भाकरी
बोटें झाडुनि तूप खूप हिरवें ती अन्नशुद्धी करी ॥ ४४ ॥

सारे ब्राह्मण जेउनी न उठले कार्यामधे लौकरी
तों उष्ट्यांतिल ती फिरून सगळे लाडूच गोळा करी
शेजाऱ्यांस बळेंच वांटुनि तसे, औदार्य दावी जना
उष्टें चोरुनि चारितां द्विजवरां खंती न वाटे मना ॥ ४५ ॥

नाहीं दुष्ट समस्तही गुण तिचे तोलावया तागडी
सर्वांना छळिते घरीं, नच टिके बाई, न दाई गडी
खोटें भाषण दुष्कृती करितसे जी पावलोपावलीं
जावें स्नान करावयास पडतां आंगावरी सांवली ॥ ४६ ॥

[ स्रग्धरा ]

हट्टानें जी सुनेची कधिं नच पडुं दे गांठ तेलातुपाशीं
वाढोनी अन्न सर्वां शिलक न उरतां हीस ठेवी उपाशी
किंवा राहे उरोनी जरि, तरि गरिबां हात वाहे न द्याया
तैसा झाला शिळा तो दिवस कितिक ती लाविते तीस खाया ॥४७

[ भुजंगप्रयात ]

'नको थंड तें रात्रिचें ताक खाऊं
नको आमटी-भाजिला हात लावूं
मुलांच्या असे रास पानांत आज
न खाया तुला पातला काय माज?' ॥ ४८ ॥

[ शार्दूलविक्रीडित ]

ऐसें एक न दोन काय म्हणुनी सांगूं तुम्हांला तरी?
जातां तेथ समक्ष एक दिवशीं होते पुरी खातरी
कैसा भात गिळे, मुलीस तुकडे जाती कसे कोरडे?
कष्टी होउन पान टाकुन उठे, राहे उपाशी, रडे ॥ ४९ ॥

[ भुजंगप्रयात ]

'मिळेना जनां अन्न हें आजकाल
पहा नाशिते ही कशी मस्तवाल
नसें मी तदा घेतसे ही चरून
पतीच्या मनीं देतसे हें भरून' ॥ ५० ॥

[ शार्दूलविक्रीडित ]

ऐसे हाल तिचे बघून अमुच्या पोटांत येई दया
देईं नेउनि मी तिला न कळतां कांहींतरी खावया
येतां संशय ती पुढें मजवरी ठेवी पुरी पाळत
तेव्हां सर्व उपाय खुंटुनि यमू गेली पुढें वाळत ॥ ५१ ॥

[ स्रग्धरा ]

आंबे ठेवोनियां जी खिडकिंत कुलुपें लावुनी सर्वकाळ
'खाते चोरोनि' ऐसा हिजवर भलता घेतसे रोज आळ
मोठी खोटी स्वभावें जरि तरि नवरा तीस होवोनी राजी
कैवारें बायकोच्या, शिवशिव! कितिदां डाग देवोनि भाजी ॥ ५२ ॥

ऐशी त्या बापडीची छळुनि पुरविते रोजच्या रोज पाठ
रात्रीमाजीं सुखानें कधिं नच पडुं दे नोवऱ्याशींहि गांठ

एकांतीं भेट होतां सहज हळुहळू बोलण्याचीहि चोरी
'ह्यांचा तो नेम नाहीं' म्हणुनि टपतसे, 'फार फाजील पोरी' ॥ ५३ ॥

[ शार्दूलविक्रीडित ]

घोडी वाढुनि होय ही, परि असे बाळास का तें वय ?
हीच्या संगतिनें पडून झुरणी होईल त्याला क्षय'
बाहेरून कुलूप लावुनि हिला रात्रीस कोंडी बळें
'बाळा तो सुकुमार पोर अजुनी कांहीं न त्याला कळे ॥ ५४

[स्रग्धरा ]

तांब्या घेऊनि कोठें निघसि लगबगां सोडुनी सर्व लाज
बाळा बोले न कांहीं, जुलुम उगिच कां ? नीज येथेंच आज
हेडंबेसारखे हे स्वरुपगुण तुझे, आवडेना तयास
आतांशा पाहतांना म्हणुनिच दिसतो सर्वदा तो उदास' ॥ ५५ ॥

[ इंद्रवज्रा ]

दोघांमधें येउनि नित्य आड
होईल तो घालितसे बिघाड
दोघांतलें प्रेम तिला न साहे
पाण्यांत ती ह्यास्तव नित्य पाहे ॥ ५६ ॥

[ स्रग्धरा]

रात्रीं नेसोनि शालू नटुनि उलट ते केंसही विंचरून
वेणीचा उंच खोपा सजवुनि गजरा घालिते त्यावरून
तोडे वाकी फुलेंही चढवुनि कटिला घालिते माजपट्टा
नाहीं खंती जिवाला करितिल जन कीं मागुनी सर्व थट्टा ॥ ५७ ॥

[ शार्दूलविक्रीडित ]

ऐशी आपण वागुनी छळितसे पोरीस कोण्या रिती
ताटातूट करी हिची पतिसवें, चांडाळ पापी किती
भाजी, घालुनियां उपास वरती, माया दयाही नसे
झाडे दुष्कृतिचे बया, नच कळे, देईल कोठें कसे ?" ॥ ५८ ॥

ऐकोनी सगळें मुलीस पहिली होऊन सारी स्मृती
सासूची नयनांसमोर सगळी राहे उभी दुष्कृती
झाला सद्गद कंठ, अश्रु भरले नेत्रीं, पुसोनी करीं
"जाऊं द्या" म्हणुनी प्रयत्न मग ती बोलावयाचा करी ॥ ५९ ॥

[ स्रग्धरा ]

"सासूबाईच, कां हो, खडतर म्हणतां ? मीहि दोषास पात्र
आईला आमुच्या ह्या उगिच रडकथा ऐकुनी दुःख मात्र
केलें का मायबापें तिळभर कमती ? प्रेम आहे सदैव
तेतें कर्मानुसार क्षितिवरि मनुजा दुःखसौख्यास दैव ॥ ६० ॥

[ शार्दूलविक्रीडित ]

त्रासें त्या जरि आज राग करिती पाहोनि माझ्या गुणा
होतां अंमळ जाणती चतुर मी होईल तोही उणा
आहे माणुस मुख्य सज्जन किती देवें दिलें आपलें
होतां दर्शन लोचनें मन निवे दुःखें जरी तापलें ॥ ६१ ॥

[ स्रग्धरा ]

ातें आहे मुलाचें तरिहि कळतसे आइचा राग त्यांस
ल्या वर्षीं परीक्षा, हरि करिल तरी, खास होईल पास

आनंदाचे पुढे तों दिवस उगवुनी हाहि जाईल काल
ठेवावें मात्र देवें सकलहि अमुच्या माणसांना खुशाल" ॥ ६२ ॥

ऐकोनी वृत्त, गेलें बहुत जननिचें चित्तही गोंधळून
झालें सद्वस्त्र ओलें घळघळ वरतीं अश्रुधारा गळून
आलें सारें कळोनी सुख किति मुलिच्या सर्व तें वैभवाचें
दुःखानें स्तब्ध झाली, क्षणभरि न फुटे एकही शब्द वाचे ॥ ६३ ॥

दुःखानें फार आई हळहळुनि तदा हात लावी ललाटा
"सासूच्या ऐकुनीयां कृतिस 'तनुवरी' बोलली "येत कांटा
सोन्याचा तोच जाणा दिवस उगवला, शेखदारीण बाई !
'सासू नोहें मुलीची', समजतिल जईं सासवा, 'मीच आई" ॥ ६४

* *

परिशिष्ट : १

# 'सासरची पाठवणी' - शंभर वर्षांपूर्वीची -

## (कृ. ना. आठल्ये यांच्या प्रस्तुत काव्यावरील वासुदेव केशव मावळंकर यांचे १८९६ मधील मत)

मावळंकर यांचे 'केरळ कोकिळ'च्या फेब्रुवारी १८९६ अंकातील मू
पत्र असे -

विनंती विशेष,

'सासरची पाठवणी' या कविता फार सुरेख असून लहान मुलींनी अ समजून पाठ कराव्या इतक्या सोप्याही आहेत. त्या कवितांत पतिपत्नींमध् सेव्यसेवक भाव असतो असे गृहीत धरले आहे. तशी रूढ समजूत आहे हे निर्विवाद आहे. पण त्याला खरोखर काही कारण नाही. सप्तपदीच्या भाषांतरा त्याला आधार नाही. एवढेच नव्हे तर त्या पद्यांवरून उलट दांपत्यभाव म्हण परस्पर मित्रभाव असेच स्पष्ट दिसून येते. शिवाय वधूवरात तशी समजूत अस हे मानवी स्वभावाच्या भावी उन्नतीलाही प्रतिबंधक आहे. सबब छापून आलेल्य कवितात जरी १९ व्या शतकाच्या पूर्वार्धातील रूढ समजुती व्यक्त झाल्य आहेत, तथापि त्या कविता २० व्या शतकालाही अनुरूप असाव्या अशा दृष्टी खाली लिहिलेल्या सूचना केल्या आहेत. त्या विचारांती इष्ट वाटल्यास योग्य ती तजवीज व्हावी.

१) श्लोक ५० गाळून टाकावा व त्याचेबद्दल १७ नंतर पद्याविषय एक पद्य असावे. २) खाली कोष्टकात दर्शविल्याप्रमाणे पद्यात फेरफार होणे

| पद्य | पंक्ति | मूळ | सूचना |
|---|---|---|---|
| ३ | ३ | सखे | बये |
| ६ | ३ | खोट्या विपरितमिषें | नाना परिसुनी |
| १३ | ३ | घरे मळिण हे | मलीन असणे |

| | | | |
|---|---|---|---|
| १४ | ४ | आदरे | कौतुके |
| ४१ | १ | देव | मित्र |
| ५१ | १ | सोडूं | मोडूं |
| ५१ | २ | तोडुं | सोडुं |
| ५२ | १ | देव | मित्र |
| ५२ | ३ | आज्ञेला | कार्याला |

मावळंकर यांच्या या पत्रावरून आठल्यांच्या कवितेची रसवत्ता व उपयुक्तता त्यांना जाणवली असल्याचे दिसते. साहित्याने समाजाचे प्रश्न सोडवावे, वाचकांना मार्गदर्शन करावे असे या काळात बहुसंख्य परीक्षकांना वाटत होते. मावळंकरांसारख्या प्रतिष्ठित वकिलांनाही असेच वाटत होतेसे दिसते.

मात्र बदलत्या परिस्थितीप्रमाणे साहित्यानेही बदलले पाहिजे असेही त्यांना वाटत असल्याचे दिसते. मूळ काव्यात व्यक्त झालेल्या पतीपत्नीच्या सेव्यसेवक भावदर्शनापेक्षा त्यांच्यात मित्रत्वाचे भावसंबंध असावेत असे त्यांना वाटू लागल्याचे दिसते. या दिशेने हा रसिक कवीला न दुखवता साहित्यातील आशय गरजेनुसार बदलला पाहिजे असे सांगतो.

शिवाय हा रसिक नुसता आस्वादक टीकाकार नसून चिकित्सक असल्याचेही दिसते. मावळंकरांनी केलेल्या फेरबदलाच्या सूचना त्यांच्या चिकित्सकतेची व रसिकतेची साक्ष देत आहेत. तसेच एखादा वाचक आपले मत मांडतांना किती तयारी करत होता हेही जाणवते. या पार्श्वभूमीवर पाहता आजच्या गुळमुळीत दिखाऊ समीक्षेची लाज वाटते.

समीक्षा कवीला मार्गदर्शन करते, दुरुस्त्या करून दाखवते, कालातीत आशयाच्या दिशा सुचविते, त्याचा नमुना असलेले हे छोटेसे मत आजच्या मूल्यमापनाला मदत करणारे ठरेल म्हणून दिले आहे.

* *

परिशिष्ट : २

# 'केरळ कोकिळकार'
# कृ. ना. आठल्ये यांच्याबद्दल आणखी थोडेसे

प्रा. डॉ. जयश्री पाटणकर

कृष्णाजी नारायण आठल्ये (१८५२-१९२७) हे मराठी समीक्षेच्या 'आदिपर्वा'तील एक महत्त्वाचे परीक्षक म्हणून ओळखले जातात. चित्रकलेची त्यांना लहानपणापासून आवड होती. पुढे त्यांनी जे. जे. स्कूल ऑफ आर्ट (मुंबई) मध्ये शिक्षण घेतले. सातारा, बडोदा येथील संस्थानिकांचे चित्रकार म्हणूनही त्यांनी काही काळ काम पाहिले. सर. टी. माधवरावांबरोबर ते कोचीनला गेले. तेथे त्यांनी लेखन-वाचनाकडे विशेष लक्ष दिले. भगवत्‌गीतेवरील 'गीतापद्य-मुक्ताहार' हे त्यांचे पहिले पुस्तक येथेच लिहिले गेले. याचवेळी श्रृंगेरी मठाचे जगत्‌गुरु शंकराचार्य यांचेकडून 'महाराष्ट्रभाषा चित्रमयूर' ही पदवी त्यांना अर्पण करण्यात आली. येथेच त्यांनी 'केरळकोकिळ' हे मासिक संपादण्यास सुरुवात केली. हे मासिक जवळजवळ तीस वर्षे चालले. (१८८६ ते १९१६) याच मासिकाने व त्यातील विविध विषयांवरील त्यांच्या सुबोध लेखनाने, विविध ग्रंथांच्या परीक्षणांनी त्यांची कीर्ती महाराष्ट्रभर पसरली.

समीक्षक आठल्ये स्वतः चांगले लेखक होते. विविध विषयांवरील अशी ३७ पुस्तके त्यांनी लिहिल्याची नोंद आहे. 'सासरची पाठवणी', 'माहेरचे मूळ,' 'मुलीचा समाचार,' 'दंपत्य सुखाचा ओनामा,' 'तिकुडचे पहिले पत्र,' 'गीतापद्य-मुक्ताहार,' 'शृंगारतिलकादर्श,' 'वैराग्यशतकादर्श,' 'टिळक माहात्म्य,' 'श्री तुकाराम स्तोत्र,' इ. अनेक काव्यग्रंथ त्यांनी लिहिले आहेत. शिवाय 'मराठ्यांची धामधूम,' 'श्वेतांबरा,' 'फाटके तरवार बहाद्दर,' इ. रुपांतरित कादंबऱ्याही त्यांच्या नावांवर आहेत. 'युद्धातील अघोर कर्मकथा,' 'इराणच्या राजांच्या गोष्टी,' 'पंचतंत्रामृत चषक' इ. कथा, 'मधुयामिनी स्वप्न' सारखे नाटकही त्यांचे नावावर आहे. 'आत्मसामर्थ्ययोग' अथवा 'निसर्गशास्त्र योगदर्शन,' 'सुलभ वेदान्त,' 'मेस्मेरिझम इन्स्ट्रक्टर' अर्थात मोहिनी विद्या शिक्षक,' 'माझे

कळसूत्री घर अथवा नरदेहाची रचना' 'मॅजिक इन्स्ट्रक्टर,' 'सुलभ फोटोग्राफी' अशा विविध शास्त्रीय, आध्यात्मिक विषयांवरही त्यांनी लेखन केले. स्वामी विवेकानंदांच्या, कर्मयोग, भक्तियोग, राजयोग याचेही भाषांतर केले. या शिवाय केरळ कोकिळ या मासिकात, विद्युतमानसशास्त्र व लोकोत्तर चमत्कार यासारखी विज्ञानविषयक माहितीची सदरे ते चालवीत. अशा चतुरस्त्र लेखकाने आपल्या लेखन-संपादनाने मराठी भाषेची केलेली ही सेवा म्हणूनच संस्मरणीय आहे.

'केरळकोकिळ'च्या अनेक चाहत्यांनी व वाचकांनी त्यांच्या या कामाची पावती गीतरुपात केरळ कोकिळकडे पाठविली होती. फेब्रुवारी १८९६ च्या अंकात एका रसिकाने त्यांच्या कवित्वाबद्दल, ग्रंथपरीक्षणाबद्दल व विविध शास्त्रीय विषयांवरील त्यांच्या लेखनाबद्दल लिहिले आहे -

**"जी माजी भरली सुरम्य यमके मोत्यें जशी कोंदणी ।**
**छंदो भंग नसे न अन्य असती ते दोष मात्रा गणी ॥"**

**"जेव्हा ग्रंथपरीक्षणार्थ बससी तूं आपुल्या आसनी ।**
**होसी निःस्पृह भाससी जणुं तदा सत्यव्रताची खनी ॥"**

**"नानाशास्त्र विशारद क्षणभरी ऐकूनियां डोलती ।**
**ऐसे शास्त्रिय बोल वर्णुनि तुझे टीका करावी किती ॥"**

लक्ष्मण गोपाळ देशमुख या केरळकोकिळच्या एका वाचकानेही आठल्यांच्या संपादक, समीक्षक कामगिरीबद्दल लिहिले आहे - (के. को. फेब्रु. १८९५) - "शास्त्रीय विषयांचे लेख सुबोध रीतीने लिहिलेले असल्यामुळे तत्संबंधी अभिरुची वाढविण्यास ते कारण होतील. . . . . पुस्तक परीक्षेच्या सदराखाली येणाऱ्या लेखांनी तर बाकीच्या सर्वच प्रकरणांस मागे सारण्याचा बेत केला आहे असे दिसते. त्यांत मार्मिकता, सुगमार्थता, नम्रता, निस्पृहता हे एकमेकास मागे सारण्याचा प्रयत्न करतात की काय असा वाचकास भास होतो."

परीक्षणात आठल्ये मोठमोठ्या कवी लेखकांची रेवडी उडविण्यास मागेपुढे पाहात नसत. त्यामुळे त्यांच्या टीकेचा लोकांना मोठा दबदबा वाटत असे. 'बालमित्र'चे संपादक पा. बा. मिसाळ सांगतात - (मनोहर / मे१९४९)

". . . . केरळ कोकिळात एखाद्या पुस्तकावर अभिप्राय येणे म्हणजे

खरोखर मोठी दिव्य गोष्ट होती. त्यांचे दिग्दर्शन फारच चांगले असे. त्यामुळे माझ्या कवितेच्या व्यासंगात व इतरांच्या कविता तपासण्यात मला चांगले यश मिळाले" 'मेघदूतच्छाया' या काव्याचे कवी बाळकृष्ण लक्ष्मण अंतरक यांनी केरळ कोकिळकडे अभिप्रायाच्या अपेक्षेने पुस्तक पाठवितांना लिहिले आहे (जाने. १९०८) ". . . . आपल्या आगीतून निघून शंभर नंबरी सोने ठरण्याचा मुळीच संभव नाही. पण त्यात सोन्याचा अंश असल्यास आपल्याकडून तावून सुलाखून किती कस आहे ते ठरल्याशिवाय त्याला कोणी विचारीत नाही. . . . . . परीक्षेचा रिझल्ट कळण्यासाठी जितकी विद्यार्थ्याल तितकीच माझ्या पुस्तकाविषयी आपला अभिप्राय कळण्याबद्दल मला उत्कंठा लागली आहे." अशी उत्सुकता 'संगीत वृंदावनविहार'च्या कर्त्यालाही लागली आहे. बापूजी लक्ष्मण लिहितात - (के. को./ पु. ४/ अ.१० / १८९०) "सुधी कोकिलाची अभिप्राय वाणी । जधी येउनीया पडेल स्वकर्णी तधी का न भासे मला तो वसंत । कधी निंदिती ना जयालागि संत ।" अशी अजीजी करणार व त्यांच्या टीकेचे महत्त्व मानणारा लेखकवर्ग पाहिला की समकालीनांत आठल्यांना टीकाकार म्हणून किती मान्यता होती ते दिसून येते.

अशा या आठल्यांची समीक्षक म्हणून कोणती वैशिष्ट्ये दिसतात ते पाहू.

दीर्घ काव्याची परंपरा असलेली मराठी कविता छोटी व स्फुट व्हावी हे त्यांना पटत नव्हते. दीर्घ कवितेमध्येच रचनाकौशल्याचे सारे बळ पणाला लागते अशी त्याची भूमिका होती. कविता जेव्हा स्फुट, सोपी होऊ लागली तेव्हा आठल्यांना ते पटत नव्हते. दीर्घ, वीररस प्रधान, गंभीर विषयांना जागा देणारी कविता असावी अशी त्यांची अपेक्षा असे. म्हणूनच 'रजपूत कन्या तारा'च्या परीक्षणात (के. को. ए. १८९३) ते म्हणतात, "बागेच्या शोभेला वीर रसप्रधान कविता म्हणणे, 'हेंगाड्या' दहावीस श्लोकांना 'काव्य' ही संज्ञा देणे, तुटपुंज्या कवितांना 'सर्ग' मानणे, दहाबारा पानांच्या चोपडीला 'ग्रंथ' म्हणणे आणि अशा कृतीचा खेद न करता ग्रंथकर्ता म्हणून आढ्यता मिरविणे यापेक्षा सरस्वती देवीची विटंबना ती कोणती ? "कवित्व हे नव्हे टांकसाळी नाणे" ही तुकारामाची उक्ती ग्रंथकारांनी ध्यानात घ्यावी' असे ते बजावतात. कवी पैशाला पासरी होऊ नयेत हीच यामागे अपेक्षा दिसते. कवि जितका जुना व कसलेला तितकी त्याची

काव्यरचना शुद्ध, निर्दोष, सरस व प्रौढ निपजावयाची हा जगाचा सिद्धांतच आहे.' (मोगऱ्यांची फुले / के. को. सप्टे. १९०४) अशी त्यांची ठाम समजूत होती. काव्य निर्दोष, सहज व्हावे ही त्यांची अपेक्षा काही चूक नव्हती. पण असे काव्य नसेल तेव्हा ते सडकून टीका करीत. 'अनेक पद्यावली'च्या कर्त्याला त्यांनी असेच झोडपून काढले आहे. (के. को / जाने. १८९२) ते म्हणतात - 'अनेक पद्यावली' या नावापेक्षा 'अठरा धान्याचे कडबोळे' किंवा 'छप्पन ठिंगळांची वाकळ' असे म्हणावयास काय हरकत ? ... कवीला छंदःशास्त्राची माहिती नाही, व्याकरण पाहिलेले नाही, शब्दज्ञान कळत नाही, पदांना संगीताच्या चाली ठोकून दिल्या आहेत;

**"खाटीक होऊन सखी त्यजीन । विद्या तसे ज्ञान मनात पूर्ण ।**
**बिंबून घेईन स्वदेश सेवा । केल्याविना ना सखि प्रेम ठेवा ॥**

'या पद्याचा अर्थ कवीस काय माहित असेल तो खरा' . . . . या टीकेमागे कवींचे अभ्यासविषयक तुटपुंजे ज्ञान त्यांना दाखवून द्यायचे आहे. कारण ग्रंथकर्त्याच्या मनात नुसती इच्छा 'धुमसण्या'पेक्षा अभ्यास 'धुमसला' पाहिजे अशी त्यांची इच्छा होती.

आठल्यांनी जे काव्यदोष म्हणून सांगितले आहेत ते परंपरेने मानलेले दोष आहेत. वृत्तभंग, ऱ्हस्वदीर्घांची ओढाताण, शब्दांची ढिसाळ व शिथिल योजना, निर्यमकता, विसदृश रचना, अनौचित्य, पादपूरकांचा वापर, छंदोभंग यतिभंग, विजोड यमके इ. दोषांची ते जेव्हा परीक्षणातून उदाहरणे दाखवून देतात तेव्हा काव्याच्या शुद्धतेकडे पारंपरिक डामडौलीकडे त्यांचे विशेष लक्ष असल्याचे दिसते. "कवि जितका जुना तितका त्याच्या काव्यात सरसपणा अधिक. बालवयस्क कवींच्या काव्यात प्रौढता व सरसत्त्व येणे दुरापास्त" (एकादश राष्ट्रीय महोत्सवाचे कविताबद्ध वर्णन / के को. पु. ११ / अं. ३१ मार्च १८९७) अशी त्यांची एक सनातनी आवडती समजूत होती.

काव्यविषयाचा खाजगीपणा हाही त्यांना याच सनातनी, संस्कृतीरक्षक दृष्टीकोनामुळे आवडत नसे. 'स्मरणी' लिहिणाऱ्या ना. के. बेहेरे यांनी ... "आपल्या पत्नीप्रेमाला असे लौकिक स्वरूप देऊन ते काव्य लोकांपुढे मांडून लोकांस टीका करण्याची संधी दिली हे बरे केले नाही" असे ते सांगतात. (के.

को./ जुलै १९१६) गोविंद पौत्रांनी लिहिलेले 'उत्तर अमेरिकेतील वसंत काल' हे अमेरिकेतील युवक युवतींच्या प्रेमालापांचे चित्रण करणारे काव्य आहे व त्यातही पौर्वात्यांना नावे ठेवणे, शिव्या देणे यांचा कहर केला आहे. म्हणून हे काव्य त्यांना, 'पश्चात्तापाची किंचाळी,' 'बेताल वृत्तीचे तिरकस प्रदर्शन' वाटते. एवढेच मत नोंदवून ते थांबत नाहीत तर पुढें म्हणतात -, 'अशा माणसांनी की ज्यांना प्राच्यांची प्रत्येक गोष्ट शिसारी आणण्यासारखी वाटत असेल त्यांनी अमेरिका सोडून इकडे मुंबईस येण्याऐवजी अफूची गोळी खाऊन बेलाशक आत्महत्या करावी व मोहिनी घालणाऱ्या युवतींनी भरलेल्या अमेरिकेत आपल्या कवितांची चुडी पोचती करावी.'

अशाच प्रकारचा राग सुधारणा सुचविणाऱ्या पुरोगामी मंडळींच्या काव्याविषयीही (तरुण विधवेचे दुःख / मार्च १८९७) ते व्यक्त करतात. विधवांचे दुःख सांगावे, त्यांना ब्रह्मचर्यव्रताचे, सन्मार्गाला जाण्याचे शिक्षण द्यावे हे त्यांना मान्य आहे पण त्यांना आहे तसेच विधवा राहू द्यावे असे त्यांना वाटते. कारण बलात्काराने पुन्हा पुन्हा त्यांना संसारात पाडणे म्हणजे त्यांच्या जन्माचा खेळखंडोबा करणे होय. तसेच त्यांना विधवा ठेवल्याने प्रजोत्पत्तीलाही बंध पडतो. अशी त्यांची सनातनी दृष्टी होती. काव्यगत आशयाशी समीक्षक समरस झाला नाही तर त्याची नावड हे त्या काव्याचे दोषात्मक मूल्य बनते. येथे आठल्यांचे तेच झाले. 'सुधारणावारणांकुश' (फेब्रु. १८९८), 'क्राफर्ड महाकाव्य' (सप्टें. १८९१), 'उत्तर अमेरिकेतील वसंत काल' (ऑक्टो १९१४) यासारख्या सुधारणापर पुरोगामी विचारांच्या काव्यावर ते याचमुळे टीका करतात.

काव्यासंबंधी त्यांची भूमिका आदर्शवादी होती. प्रस्तुत काव्ये कोणत्या काळात लिहिली जात आहेत, कोण लिहू लागले आहेत, कालमानाप्रमाणे कोणकोणते विषय काव्यात येऊ लागले आहेत यांचा ते विचार न करता, "कविता म्हणजे सहृदयत्वाचा झरा, नवरसांचा उगम, कल्पनेचा सागर, सद्बोधाचा आरसा, शब्दरत्नांची खाण, माधुर्याचा ठेवा, प्रसन्नतेचा पिकलेला मळा, मृत्यूलोकातले अमृत अशा जुन्या पंडिती परंपरादृष्टीने काव्याकडे पाहात. (मोगऱ्यांची फुले १ सप्टे. १९०४) नाट्य परीक्षणातही त्यांनी औचित्याचा विशेष आग्रह धरला. या औचित्याच्या बुडाशी त्यांचा नीतीवादी श्लील दृष्टीकोण प्रभावी होता. याला धक्का लावणारी कोणतीही कृती त्यांच्या मनात भरत नसे.

कन्या उपवर झाली असता त्या चिंतेने तळमळणाऱ्या मातापित्यांना सावित्री, स्वतःच अविवाहित राहिल्याने 'जन माझी निंदा करतील' हे भरसभेत संगीत रुपाने कशी सांगेल असा त्यांना प्रश्न पडतो. (सं. सावित्री/ जून १८९६). 'सं. राक्षसी महत्त्वाकांक्षे'तील मदालसेचे वर्तन आर्य स्त्रीस शोभणारे नाही. इतकेच नव्हे तर स्वदेशनिष्ठांच्या शीलास खचित चीड आणणारे आहे' असा त्यांचा आक्षेप आहे. 'थोर पुरुषांच्या चरित्रातील अत्युदात्त प्रसंग हेच सर्व वाङ्मयाचे जीविताधार होत' अशी त्यांची समजूत असल्याने किंवा हाच वाङ्मयीन निकष त्यांनी मानल्यामुळे 'स्वामी विवेकानंद'चे चित्रण काळिमा आणणारे झाले आहे असे त्यांना वाटते. 'अमात्यमाधव मध्ये 'माधवाचार्य कलावंतिणीच्या पोरींना हात लावतो, होमशाळेत जपमाळ ओढीत असता एकांतात खलबत करतो ...' असले प्रकार त्यांना रुचत नाहीत. आठल्यांनी सरसकट अश्लील, ग्राम्य, अनुचित चित्रणाचा निषेधच केला. याचे कारण अशा चित्रणाचा वाचकांच्या मनावर वाईट परिणाम होतो असे त्यांना वाटते.

अश्लीलतेचा निषेध व नीतीबोधाचा आग्रह हा एक महत्त्वाचा निकष म्हणून त्यांनी आपल्या कादंबरी-परीक्षणात धरलेला दिसतो. 'पहिल्या कादंबऱ्यांप्रमाणे यात दात आंबणारा शृंगार मुळीच नाही' म्हणून 'शिक्षक' ही कादंबरी त्यांना चांगली वाटते. (के. को./ पु. ४/ १८९०). 'विहंगवृंद' ही कादंबरी (जून - १९१५) 'एक वेळ वाचली तरी चांगल्या प्रकारचा बोध होऊन मनाची चांगली करमणूक होते' असे त्यांना वाटते. 'उषःकाल'च्या परीक्षणात (फेब्रु. १९१३) 'प्रणय गोष्टींशिवाय कादंबरी लिहिणाऱ्या हरिभाऊंचे अनुकरण करावे, कादंबरीची पारायणे करावी' अशी त्यांनी केलेली सूचना त्यांच्यातील नीतीबोधकाचेच दर्शन घडवते.

आठल्यांना निर्दोष, शुद्ध, सद्‌भिरुचीसंपन्न साहित्याची आवड असल्याने व प्रत्यक्षात तशा कलाकृती उपलब्ध होत नसल्यामुळे ते अधिकाधिक चिडत, रागावत, स्पष्ट निषेध करीत. 'विचाररत्नाकर' या उपाध्ये यांच्या भाषांतरित ग्रंथास गायकवाड सरकारने जे साहाय्य केले ते अनाठायी गेले. कारण लेखकाला मराठी भाषाही धड येत नाही असे आठल्यांचे मत होते. यासाठी त्यांनी उपाध्यांच्या अ-मराठी शैलीची विपुल उदाहरणे दिली आहेत. उदाः- 'तुझे तोंड निर्चव झाले आहे काय?' 'ठरीव विषय आणि मजकूर असतात' यासारख्या

वाक्यांनी भरलेला ग्रंथ आठल्यांना, '. . . . शीतला देवीची कृपा झाल्याने मुखकमलाची चाळण होऊन हातापायांची धनुकली झालेल्या, डोळ्यांत वडस वाढून विद्रुपता आलेल्या तरुणीसारखा वाटतो.' म्हणून ते म्हणतात गायकवाड महाराजांचा पैसा पाण्यात गेला . . . . 'महाराष्ट्र भाषेत एका रद्दड पुस्तकाची भर पडली. . . . ." असेही मत नोंदवतांना त्यांना सरकार, संस्थानिक या कोणाचेच दडपण वाटत नसे. 'सुधारणावारणांकुश'चे कवि के. स. रि. यांचे सामान्य कवित्व, सुधारकांवर केलेली शिवीगाळ व अपशब्दांचा पाऊस पाहता आठल्यांच्या लेखणीला धार चढते. के. स. रि या कवीने आपल्याच नावाचा संक्षेप करण्याच्या पद्धतीवर काव्य करतांना -

> **"ही आंग्ल पद्धति सुता पितर त्रयाची ।**
> **नावे सबंध तरि जाणविते कशाची ?**
> **एकाक्षरेंचि मग तो स्वपितृत्रयातें ।**
> **उच्चारुनी तनय दे पितृपिंड हाते ॥**

असे म्हणतात तेव्हा आठल्ये लिहितात - "स्वतः तोच दोष करून दुसऱ्याची टवाळी करणे हा कोण बाष्कळपणा ? के. स. रि. छाव्यास मागेपुढे पिंड देण्याचा प्रसंग येईल तेव्हा कोणती पितरत्रयी उच्चारावयाची ? के. स. रि. हीच ना ? "असा खवचट प्रश्न आठल्येच विचारू जाणे. अक्षरसाम्य, मात्रासाम्य यांची रेलचेल उडविणाऱ्या कृत्रिम व तांत्रिक के. स. रि. कारांच्या काव्यास टोला देतांना ते म्हणतात -

> **"अबला गृहशिक्षणेंच सगळ्या गृह व्यवस्थेच्या सरणिंत ।**
> **राहुनि मुरल्या जावोत सतत जसे लोणचे ते बरणित ॥"**

या के.स.रि.कारांच्या 'गृहगिरणित' तयार झालेल्या लोणच्याच्या बरणीची करणी कशी आहे ? 'च' चा किंवा 'हो' चा ठेपा दिल्याशिवाय आमच्या कवींचा पद्याचा एक चरण धरधरील तर शपत यमकेही कशी . . . .
ज्याने मोठी भरत क्षितिची मारुनि हिल्लर, वृद्धपणे मग होऊनि झिल्लर, जाऊनि बैसे सांप्रति जो इंग्लंडी स्थिल्लर, असा वेदपुरुष मोक्षमुल्लर . . . ." ही अशी रचना पाहिल्यावर म्हणतात . . . . "के. स. रि. घालील तो शब्द लावील तो अर्थ, करील ते रूप आणि जुळवील तो प्रास" म्हणजे "शेतात घातलेली ताल

आणि आगरात रचलेला गडगा ह्यापेक्षा कवितेची मातब्बरी काहीं अधिक नाही."

काव्याच्या ओबडघोबड, दोषपूर्ण, विजोड यमक रचनेविषयी ते लिहितात (मार्च १८९७) - 'तरुण - विधवेचे दुःख' यात यमकदोष, छंदोभंग, द्विरुक्ती यांचा अतिरेक झाला आहे.

**"अदळुन अपटुन, त्रासुन अरडुन नसत्या रागाने ।**
**देणे, घेणे, करणे, वदणे, दुरुक्तिने हाणणे ॥'**

या पद्याविषयी ते म्हणतात - 'अदळुन ते काय आणखी अपटुन (आपटुन नव्हे हो !) ते काय ? अदळणे, अपटणे, अरडणे हे मूळ स्वरुपाचे कार्ड साइज फोटो आहेत. दीर्घ स्वराचे म्याग्निफाइंग ग्लास घेतल्यास कदाचित त्याचे काने व्यक्त झाल्यास होतील." हा तिरकसपणा या काळात आठल्यांच्या इतका कोणीच व्यक्त केलेला दिसत नाही. यावरून आठल्यांना निर्दोषतेचे किती वेड होते ते दिसून येते.

आठल्यांनी कथा, कादंबरी, नाटक आणि शास्त्रीय पुस्तकेही लिहिली आहेत. त्यामुळे साहित्याच्या साहित्यत्वाची त्यांना चांगली जाणीव आहे. फक्त ती अतितार्किक, कठोर व उपयुक्ततावादी आहे. 'निर्मला,' 'तरुणाला,' 'जरठोद्वाह,' 'अमात्यमाधव'च्या परीक्षणात त्यांनी पात्रचित्रणातील स्वाभाविकता, वास्तविकता, हुबेहुबपणा, प्रमाणबद्धता, नवीनता, चटकदारपणा या गुणांची अपेक्षा केली आहे. फक्त आठल्यांच्या वास्तवतेच्या निकषात उपयुक्तता गृहीत असे.

आठल्यानी नाट्यपरीक्षणात संहितेवर - पाठ्यावर अधिक भर दिला. ते स्वतः कोचीनला राहात असल्यामुळे नाट्यप्रयोग पाहून ते परीक्षण करू शकत नव्हते. त्यामुळे संहितेच्या बांधेसूदपणाकडेच त्याचे अधिक लक्ष असे. 'भीमसिग व पद्मिनी'च्या परीक्षणात ते म्हणतात -,'११६ पानांचे सर्व नाटक त्यात, ६०० विश्वे अभिनयसूचक व आत्मगत भाषणांचे कौस.' यावरून उच्चारानुरुप व प्रयोगलक्षी नाट्याचा ते विचार करू शकत नव्हते. 'जरठोद्वाह'त नाटककाराने वापरलेल्या कुणबाऊ, मुसलमानी, धेड गुजरी भाषेचे महत्त्व त्यांना उमजू शकले नाही. त्याला ते खिचडी म्हणतात. समकालीन लोकांची नाट्यप्रयोगातील संगीत भक्तीही त्यांना पसंत नव्हती. किर्लोस्करानंतर संगीत नाटकांचे पीक आले व

संगीत नारळीपौर्णिमा, सं. दिवाळी, सं. दसरा, सं. शिमगा इतकेच काय एका संगीत भक्ताने संगीत रडणेसुद्धा रडून दाखवले, पण या अतिरेकाला किर्लोस्कर जबाबदार नाहीत हे आठल्ये समजून घेत नाहीत, फक्त तक्रार करतात. आठल्यांचा हा उणेपणा भाषेच्या थयथयाटात लुप्त करण्याचा त्यांचा डाव असावा.

'सं. राक्षसी महत्त्वाकांक्षे'च्या (जून १९१४) परीक्षणात आपल्या नाटककारांनी रंगभूमी पटकाविण्याबरोबर वाङ्मयातही स्थान पटकावले पाहिजे. .... नाटक हे स्वयंकल्पित असले तरी एका विवक्षित स्थलकालाची योजना त्यात करून घेतली पाहिजे ....रंजनासाठी नाटकात आवश्यक असा प्रेममसाला हवा.....पात्र प्रवेश करतांना ते पात्र आले कोठून, निर्गम होतांना जाते कुठे हे व्यक्त झाले पाहिजे.' ....नाटक ही काही पाल्हाळाने लिहिण्याची कादंबरी नव्हे..... 'एखाद्या गाथेप्रमाणे तीही प्रवेशापुढे प्रवेश आणि बरेचसे प्रवेश झाले म्हणजे पडदा पाडून कर त्याचे मधूनमधून वेगळे अंक .... असे केल्याने नाटक बेडौल होते,' यावरून आठल्यांना नाटक म्हणजे काय हे तत्त्वतः चांगले समजू लागल्याचे दिसते.

या काळात नाट्यक्षेत्रात एक वेगळाच धाडसी विचार त्यांनी मांडला. तो म्हणजे - 'स्त्रियांच्या भूमिका (स्त्रियांनी करण्यापेक्षा) पुरुषांनी करणे हे व्यंग्य आहे.' (अमात्य माधव) यावरून त्यांची रसिकता दिसते.

काव्याला ते एक रचना मानतात. रचना म्हटली की तेथे सुबकतेची खटपट आलीच. ती कवींनी केलीच पाहिजे. प्रसाद हा कवितेतील ईश्वरदत्त गुण. तर यथायोग्य छंद, पदलालित्य, अर्थ माधुर्य हे साधित गुण असतात. काव्याला ते दस्तऐवज मानतात. त्यामुळे दस्तऐवजाप्रमाणे काव्यातील प्रत्येक वाक्य निःशंक हवे. त्यात खोगीर भरतीचा शब्द नको. कवितेत 'र' ला 'ट' जोडले म्हणजे काम झाले असे नसते असे ते बजावतात. यावरून आठल्ये काव्यात नुसती रचना महत्त्वाची मानत नसून त्यात प्रसाद व सामाजिकदृष्ट्या उपयुक्तताही अपेक्षितांना दिसतात. कला ही जीवनापासून वेगळी काढली पाहिजे असे नाही. ती जीवनाचाच एक भाग आहे असे त्यांना वाटत असावे.

कादंबरी परीक्षणातहि त्यांचे रचनाविशेषांकडे ठाकठिकीकडेच अधिक लक्ष असल्याचे दिसते. 'कादंबरी खोटी असली तरी रचना खरी पाहिजे.'

(राजकुवर/ मे १९१६) रचनेत अनेक तऱ्हेचे संबंध एकचित्र गुंफलेले असावे. 'सर्व उपकक्षांचे एकजीवीकरण झालेले असावे. (उषःकाल/ फेब्रुवारी १९१३) 'अनेक पोटभागांचे मुख्य कलाकृतीला चालना देण्याचे कार्य असते.' अशी कादंबरीच्या बंदिस्त व एकसूत्री रचनेची ते अपेक्षा करतात. कथानकात पाल्हाळापेक्षा नेमकेपणा व संक्षेप असणे आवश्यक आहे असे ते 'निहालकुवर'च्या (मार्च १८९१) परीक्षणात म्हणतात. कादंबरी चटकदार व चित्तवेधक होण्यासाठी त्यात थक्क करुन टाकणारे Sensational प्रसंग हवे. (उषःकाल / फेब्रु. १९१३) आठल्यांची ही कादंबरी विषयक दृष्टी आजही नाकारण्यासारखी नाही.

अश्लीलतेचा निषेध व नीतीबोधाचा आग्रह कादंबरीसारख्या कथन व वास्तवदर्शी वाङमयप्रकारात आठल्यांनी न अपेक्षिला तरच नवल होते. 'शिक्षक' मध्ये दात आंबणारा शृंगार नसणे, 'विहंगवृंद' वाचून मनाला बोध होणे, 'उषःकाल'चे प्रणयन्यूनत्व त्यांना उल्लेखनीय वाटते. तर 'अनंग मोहिनी'तील 'मोहिनीने जावेचे चुंबन घेणे, दहा वर्षाच्या दीराचे चुंबन घेणे, निर्मलेने लग्नापूर्वीच विनोदाच्या खांद्यावर हात टाकणे' इ. प्रसंगातील असंभवनीयत्व व अव्यवहारीपणा त्यांना खुपतो तो त्यांच्या नीतीवादी दृष्टीमुळेच. कारण कादंबऱ्या या बायका मुलांसाठीच असतात अशी त्यांची समजूत होती. यावरून आठल्ये वाङ्मयाचे परीक्षक असले, वाङ्मयाविषयी त्यांना प्रेम असले तरी वाङ्मयाची उपयुक्तता व मार्गदर्शकता ते दृष्टीआड करू शकत नव्हते.

आठल्ये आग्रही व पारंपारिक मूल्यसरणीचे चाहते असले तरी त्यांचे ठिकाणी स्वदेशनिष्ठा, 'स्वतंत्र' साहित्याविषयीचा आग्रह होता. 'क्राफर्ड' वरील वि. र. करंदीकरांच्या (सप्टें. १८९०) काव्याचा उपहास करण्याचे कारण क्राफर्ड हा परकीय व लाचखोर इंग्रज अधिकारी होता. त्यामुळे हिंदी माणसाने अशा माणसाला नायकाच्या जागी कल्पून त्यावर काव्य रचावे हा प्रकार देशभक्तीच्या दृष्टीने घृणास्पद व लाचारीचा वाटतो. 'क्राफर्ड महाकाव्य हा काय विषय आहे ?' असा निरुत्तर करणारा प्रश्न ते विचारतात. एलफिंस्टनचे कृष्णाजी बल्लाळ गोडबोले यांनी लिहिलेले चरित्र त्यांना एवढे विश्वसनीय वाटत नाही. कारण या पुस्तकातील बराचसा भाग एलफिंस्टनच्या रोजनिशीतून घेतला आहे. व 'अशा परकी लोकांच्या द्वाराने आलेली माहिती - यात कमीजास्त असण्याचाच

संभव जास्त.' .... अशी शंका ते घेतात तेव्हा तेथे साहित्याची विश्वसनीयता, सत्यता व देशनिष्ठा व्यक्त होते.

आठल्यांना, साहित्याची भाषा संस्कृतमिश्रित प्रौढ व गंभीर असावी असे जरी वाटत असले तरी प्राचीन मराठी भाषा, प्राचीन कवी या विषयी त्यांना प्रेम होते. उपाध्ये यांनी बेकनच्या निबंधाचे जे भाषांतर केले आहे (विचार रत्नाकर / फेब्रु. १८९५) त्यांच्या परीक्षणात उपाध्यांनी संस्कृत सुभाषितांचे जे साहाय्य घेतले आहे त्याऐवजी मराठी कवींची सुंदर वचने घ्यावयास हवी होती असे त्यांना वाटते. उदा - "ईश्वर पर्जन्य वृष्टि आणि सूर्यप्रकाश, पाषाण व सुपीक जमिनीवर सारखाच पाडतो" या उद्‌गारांशी "नाही विचारित मेघ हगणदारी शेत" ही तुकारामाची उक्तीच उद्‌धृत करायला हवी होती असे ते म्हणतात. त्याचप्रमाणे क्रोधावर रामदासांचे विचार, सत्यावर मुक्तेश्वरांचे विचार हे दाखल केले असते तर विशेष शोभा आली असती असे त्यांना वाटते. यावरून पाश्चात्यांचे किंवा संस्कृताचेही सरळ सरळ अनुकरण, अनुवाद करण्यापेक्षा आपल्याही मराठी साहित्यात, देशी परंपरेत काय आहे याचा कवींनी, भाषांतरकर्त्यांनी शोध घ्यावा व तुटलेले नाते जोडून घ्यावे असे आठल्यांना वाटत असावे.

अनुकरणाचा निषेध ही या देशीय दृष्टीचीच दुसरी बाजू. 'सं. चंद्रसेना'त शेक्सपियरच्या As you like it'चे व 'मृच्छकटिक'चे अनुकरण आहे. 'सं. राक्षसी महत्त्वाकांक्षेत' पारशी नाटक मंडळीतील संगीताचे, अभिनयाचे अनुकरण आहे. 'अमात्य माधव' तर आंग्लकवींची कृती डोळ्यापुढे ठेवून गिरविल्याने तिच्यातील बरीच छाया हिच्यातही उतरली आहे.' असा ते आरोप करतात. 'कन्याविक्रय दुष्परिणाम' हे नाटक तर दोघादोघांनी लिहिल्यामुळे श्रेयाची हिस्सेसरशी कशी करायची असा प्रश्न त्यांना पडतो. यासंबंधीचे त्यांचे वाक्य फार मार्मिक आहे. ते म्हणतात, 'असल्या हिस्सेसरशीत सत्कीर्तीची ओढाताण आणि अपकीर्तीची ढकलाढकल करण्यास संधी चांगली मिळते.'

या विविध पुराव्यांवरून आठल्ये हे विसाव्या शतकातील एक महत्त्वाचे टीकाकार होते हे लक्षात येते. त्यांनी स्वत: जशी ३७ पुस्तके लिहिली तशी - १०७ पुस्तकांवर परीक्षणेही लिहिली आहेत. लेखक - समीक्षकाच्या जोड गोळीचे कार्य काही लहानसहान नव्हते. आठल्यांनी आपल्या स्पष्ट, निर्भीड,

व्याकरणशुद्ध व चटकदार टीकेने काही काळ वाचकांना प्रभावित केले. मात्र त्यांच्या अतिचिकित्सक व विघटनात्मक टीकादृष्टीमुळे काही लेखक लेखनकामाठीपासून परावृत्तही झाले असतील. पण त्यांना आपल्या शुद्धता, नैत्तिकता, श्लीलता, सदभिरुचीपुढे त्याचे काही घेणे-देणे नव्हते. यामुळे काही वेळा त्यांची टीका दंशपूर्ण व वैयक्तिक छद्मीपणाकडे झुकली. काळापलीकडे गेलेल्या आठल्यांचे फटकारे मात्र आजच्या वाचकाला आजही वाचावेसे वाटतात. दुसऱ्याला कोपरखळ्या मारणारे लिखाण कोणाला आवडत नाही? मात्र आजच्या सुमार, पसरट, बाष्कळ, निर्बंध साहित्यनिर्मितीच्या काळात आठल्ये हवे होते असे मात्र वाटत राहते.

* * *

परिशिष्ट : ३

# 'अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवक' या ग्रंथातील श्री. आठल्ये यांच्याबद्दलची माहिती

**आठल्ये कृष्णाजी नारायण** (१८५२-१९२७) कवी व निबंधकार. सातारा जिल्ह्यांतील कऱ्हाड तालुक्यांतील टेंभू नांवाचे गांवी यांचा जन्म झाला. यांचे वडील दशग्रंथी ब्राह्मण असून, ब्रह्मावर्तास बाजीरावांपाशीं वामनराव म्हणून एक राजवैद्य असत त्यांचे आश्रयास पुष्कळ वर्षे होते. वयाच्या बाराव्या वर्षापर्यंत यांचें घरीच शिक्षण झालें. यांचे वडिलांनीं यांजकडून संहिता, शिक्षा, ज्योतिष, छंद, निघंट, पूजा, वैश्वदेव, सौर, रुद्र वगैरेंचा अभ्यास करून घेतला होता. या वयापर्यंत यांस मोडी लिहितां किंवा वाचतां येत नसे. तेराव्या वर्षी यांचें लग्न झालें. सासुरवाडी थोरामोठ्यांची होती. जांवईबुवांनीं इंग्रजी शिकावे अशी श्वशुरांची इच्छा असल्यामुळें त्यांनीं त्यांस कोल्हापुरास नेण्याची खटपट चालविली. परंतु वडील परवानगी देईनात. पुढें त्यांच्या बंधूंनीं त्यांस १८६६ मध्ये कऱ्हाडास शाळेंत घातलें. या ठिकाणीं त्यांचें मराठी पांच-सहा बुकें व थोडेंसे इंग्रजी शिक्षण झालें. इंग्रजी शाळेंत असतां प्रि. गोपाळराव आगरकर त्यांचे वर्गबंधु होते. भरपूर आश्रय न मिळाल्यामुळें कृष्णाजीपंतांस कऱ्हाड सोडून पुण्याचा मार्ग धरावा लागला. तेथील ट्रेनिंग कॉलेजांत राहून, मधुकरी मागून त्यांनी मराठी अभ्यास पुरा केला व सातारा जिल्ह्यांत शिक्षकाची नोकरी पत्करली. ही नोकरी त्यांनी पांच वर्षे केली. या सुमारास रावबहादुर चिंतामणराव नारायण भट, सबजज्ज यांच्याशीं त्यांचा परिचय झाला. रा. ब. भट यांचा कृष्णाजीपंतांवर लोभ जडला. कृष्णाजीपंतांस लहानपणापासून चित्रकलेचा फार नाद असे. हा त्यांचा नाद पाहून रावबहादुरांनीं त्यांस चित्रकलेचें शास्त्रशुद्ध ज्ञान संपादण्याकडे मन वळविलें व त्यांस मुंबईस जे. जे. आर्ट स्कूलमध्यें राहण्यास उत्तेजन दिलें. रावबहादुरांच्या इच्छेप्रमाणें कृष्णाजीपंतांनीं आपल्या जागेचा राजिनामा दिला व मुंबईस येऊन आर्टस्कूलमध्यें नांव नोंदलें. आर्टस्कूलमध्यें

हे जवळ जवळ तीन वर्षें राहिले व तैलचित्रकलेचें ज्ञान त्यांनी पूर्णपणें अवगत करून घेतलें. मध्यंतरी सातारच्या आबासाहेब महाराजांनी यांस आपल्याजवळ ठेवून घेऊन आपली एक मोठी तसबीर त्यांचेकडून काढून घेतली. आर्टस्कूलमधील अभ्यास पुरा झाल्यावर ते बडोद्यास गेले. येथील हायस्कुलांत यांचें 'रंगकलेवर' एक व्याख्यान झालें. हे व्याख्यान त्यावेळचे बडोद्याचे दिवाण सर टी. माधवराव यांस इतकें आवडलें कीं, त्यांनीं त्यांस दरमहा शंभर रुपये पगारावर आपलेकडे ठेवून घेतलें. माधवराव चित्रकलेचे फार मोठे चहाते असत. त्यांनीं त्यांस आपल्या बैठकीच्या खोली शेजारील एक खोली काम करावयास दिली होती. या ठिकाणीं त्यांनीं श्री. जम्नाबाईसाहेब गायकवाड, ताराबाबा सावंतवाडीकर, रघुनाथराव भोंसले सावंतवाडीकर, डॉ. भालचंद्र, रावबहाद्दूर कीर्तने यांच्या तसबिरा चितारल्या. पुढें राजे सर टी. माधवराव दिवाणगिरीचें काम सोडून मद्रासेस गेले. अर्थातच कृष्णाजी पंतांसहि त्यांचेबरोबर तिकडे जाणें भाग पडलें. कृष्णाजीपंतांचे बंधु त्यावेळीं मलबारांत कोचीस असत. ते आजारी पडल्यामुळें मद्रास सोडून त्यांस कोचीस जावें लागलें. याच ठिकाणीं ते जवळ जवळ वीस वर्षें राहिले. व्हॉलकॉर्ट ब्रदर्स नांवाची एक कंपनी येथें आहे. त्याचे क्लेन नांवाचे एक एजंट होते, त्यांचे ते हिंदुस्थानी भाषा शिकविणारे कायम पंडित म्हणून राहिले. कोचींत स्थिरस्थावर झाल्यावर भगवद्गीतेवर नाना वृत्तात्मक श्लोकांचें 'गीतापद्य-मुक्ताहार' नावांचें पुस्तक यांनीं लिहिलें. हेंच त्यांचे पहिलें पुस्तक होय. या पुस्तकाबद्दल निर्णयसागर छापखान्याच्या मालकांनी त्यांच्या हातांत १२ तोळयांचे सोन्याचें कडें घालून सन्मान केला. याच वेळी त्यांस श्रृंगेरी मठाचे जगद्गुरु शंकराचार्य ह्यांच्याकडून 'महाराष्ट्र-भाषाचित्रमयुर' ही पदवी अर्पण करण्यांत आली. यानंतर ज्याच्यायोगें त्यांचें नांव महाराष्ट्रभर झालें, तें केरळ कोकिळ मासिक त्यांनी संपादण्यास सुरवात केली. हें मासिक प्रथम पांच वर्षें कोचीस निघत असे. नंतर तें मुंबईस गुर्जर कंपनीकडून प्रसिद्ध केलें जाऊं लागले. या मासिकाचे भर अमदानीत तीन हजारांवर वर्गणीदार होते. महाराष्ट्रांत सामान्य जनांत बहुविध वाचनाची गोडी जर कोणी प्रथम उत्पन्न केली असेल तर ती कृष्णाजीपंतांच्या केरळकोकीळ मासिकानेंच होय. यांत विविध विषयांवर लेख येत. यांतील कविता, पुस्तकपरीक्षणें, लोकोत्तर चमत्कार यांवर वाचकांच्या अधिक उड्या पडत.

"रा. आठल्ये यांनी पंचवीस वर्षे 'केरळकोकिळ' द्वारें असंख्य

वाचकवर्गास बहुश्रुत करून त्यांना वाङ्मयाची गोडी लाविली. यांची भाषाशैली चटकदार, कविता टापटिपीची व व्याकरणशुद्ध, आणि विषययोजना बहुविध व चमत्कृतिमय; तथापि त्यांच्या समालोचनपद्धतीबद्दल मतभेद असून ती अनेकवेळां अवास्तव कडक, दंशपूर्ण आणि वैयक्तिक, छद्मी, थोडक्यांत विघटनात्मक होती, असा पुष्कळांचा आशय आहे. 'कलमबहाद्दरांस शेलापागोटें' देण्याचा त्यांचा उपक्रम सद्‌भिरुचीस विरुद्ध असून त्यांत शारदोपासकांची थट्टा असे. दरबाराचा आव घालणारे हे 'पंच' स्वतः अश्लीलपणाच्या थडीवर घसरतांना कित्येकदां वाचकांनीं पाहिले असतील. अशांनीं केवळ कलमांच्या अणीवर व शाईच्या गहिरेपणांवर भिस्त ठेऊन भालाईती गाजविणें असमंजसपणाचें होतें. परंतु हा प्रत्याघात धाकट्या चिपळोणकरांच्या टीकापद्धतीचा अतिरेक झाल्यामुळें अवश्यप्राप्त होता; आणि तो केव्हांतरी आलाच असता. तथापि त्यांची चलती अल्पकाळ राहिल्यामुळें वाङ्मयाच्या प्रागतिक ओघास विशेष अपाय झाला नाही, ही समाधानाची गोष्ट आहे. इंग्लंडांत देखील सुरुवातीला पांच पन्नास वर्षें अशा प्रकारची टीकापद्धति मान्य झाली होती. जेफ्रे, सिडने स्मिथ, मेकॉले हे याच पद्धतीचे पुरस्कर्ते व प्रवर्तक होते. आणि त्यांचें पोतेरें खाल्ले नाही असा लेखक त्यावेळी विरळ आढळे. एखाद्यानें ग्रंथ तयार करून छापला कीं तो चवाठ्यावर आला असे समजून, त्याच्या उणेपणाची तपासणी भर चावडीवर करून, त्याचे असते नसते दोष वेशीवर टांगावयाचे, ही त्यावेळची रीत होती. विधायक टीका, घटनात्मक चर्चा व रसिकावलोकन हे समालोचनपद्धतीचे भाग पुढें फ्रेंच नमुन्यावरून मॅथ्यू अर्नाल्डनें इंग्लंडांत प्रचलित केले. अर्थात् शास्त्रीबुवांच्या वेळेस हे (जेफ्रे, मॅकॉले वगैरेंचे) नमुने लोकहितवादी, रानडे, दयानंद सरस्वती, प्रार्थनासमाजवाले इत्यादिकांच्या उपहासासाठी कदाचित् गिरविण्यासारखे असतील, म्हणून त्यांचा फायदा त्यांनीं चाणाक्षपणानें घेतला. परंतु ही विद्या, अस्त्रें परत कशीं आणावीं हें जाणणाऱ्यांनींच, काल प्रसंग व माणूस ओळखून अंमलांत आणावी लागते. 'केरळकोकिळची' जुनीं पुस्तकें चाळल्यास आमच्या म्हणण्यास पोषक असें त्यांत पुष्कळ सांपडेल, याची आम्हांस खात्री आहे. टीकात्मक लेख वाङ्मयाच्या व्यवसायास उन्नतपणा व जबाबदारी आणतात; पण ती टीका नेहमीं न्याय्य असावी. निस्पृहपणा हा गुण आहे. पण त्याची पडसांवली फटकळपणावर पडत असल्यामुळें न्यायीपणाचें परिवर्तन अनेकवेळां निष्ठुरपणांत होतें. म्हणून

तें न होण्याची खबरदारी बाळगली नाही, तर मुक्तेश्वरानें वर्णिलेली अवगुणाची एकच माशी या रसानुभूतीच्या भोजनांत माती कालवून अरुचि आणण्यास पुरेशी होते. असा प्रकार कोकिळकारांच्या पुष्कळ टीकाविषयक लेखांत आढळतो; परंतु अशी विघातक टीका ग्रंथकारांस उत्साहकारक होतच नाहीं, पण वाचकांस मात्र ती गारठवून सोडते, हें पुष्कळांस उमजतच नाहीं !"

**(नी. ब. भवाळकर, विविधज्ञानविस्तार, वर्ष ५७, पृष्ठ २०२)**

कृष्णाजीपंतांचें लिहिणें हृद्य आणि आकर्षक असे आहे. त्यांची भाषा बरीचशी संस्कृतप्रचुर असली तरी त्यांतील काव्यात्मतेमुळें ती वाचकांच्या हृदयास भुलावणी पाडी. कृष्णाजीपंतांची एक वादकुशल टीकाकार म्हणून विशेष ख्याती होती.

**आठल्ये यांचे वाङ्मय** :- (१) ब्रह्मचर्याश्रम. (२) सुलभ वेदांत. (३) कर्मयोग. (४) आर्याबद्ध गीता. (५) सार्थ दासबोध. (६) राजयोग. (७) ज्ञानेश्वरी सार्थ. (८) ग्रहदशेचा फटका. (९) मथुरा-गणेश सौभाग्य. (१०) माहेरचे मूळ-काव्य. (११) मुलीचा समाचार-काव्य. (१२) शृंगारतिलकादर्श-काव्य. (१३) सासरची पाठवणी-काव्य. (१४) सुश्लोकलाघव-काव्य. (१५) पंचतंत्रामृत-कादंबरी. (१६) विवेकानंदजीवन. (१७) मुलें थोर कशी करावीं. (१८) ज्ञानेश्वऱ्यांचें गौडबंगाल. (१९) माझे कळसूत्री घर अथवा नरदेहाची रचना. (२०) नजरबंद शिक्षक. (२१) माझें गुरुस्थान. (२२) वसंत पूजा. (२३) समर्थांचें सामर्थ्य. (२४) फांकडे तलवारबहाद्दर. (२५) गीतापद्यमुक्ताहार.

* * *